गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ।

महाराष्ट्र-कुटुंब-माला

पुष्प १० वें

# क म ला-का न्त



लेखक

सदाशिव काशिनाथ गोखले

बी. अे., बी. टी.



डिसेंबर १९३१



किंमत ८ आणे

# दोन शब्द—

कमला-कान्त ही पूर्ण कादंबरी नसून हा एक प्रसग आहे कमला व कान्त हे नूतन परिणत प्रेमळ जोडपें आहे. कमला बरेच दिवस आजारी असल्यामुळें व घरांत तिची शुश्रूषा करण्यास कान्ताशिवाय कोणी नसल्यामुळें आपल्या जीवाभावाची मैत्रीण शान्ता हिला कमला बोलाविते. रोग असाध्य असून आपण त्यांतून वाचत नाही असें कमलेस वाटतें व आपल्या पाठीमागें आपल्या पतीनें शान्तेबरोबर लग्न करून ससार थाटावा अशी आपली मनीषा ती कान्त व शान्ता यांना कळविते. या सूचनेमुळेंच कीं काय शान्ता व कान्त एकमेकांवर प्रेम करावयास लागतात व या प्रेमांकुराचें परिणत स्वरूप जेव्हां कमला पहाते त्यावेळीं तिला कसेसेंच वाटतें. आपलीच गोड इच्छा फळाला आली हें पाहून ज्या कमलेला आनद वाटावयास पाहिजे ती मत्सरानें पेटून आपलें शरीर-दौर्बल्य झुगारून देते व पुढें बरी होते. शान्तेची स्थिति विचित्र होते. आपल्या मैत्रिणीच्या इच्छेमुळें आवडत्या सुधाकरास विसरून कान्तावर प्रेम करण्यास लागलेल्या शान्तेला इकडे आड व इकडे विहिर असें होऊन जाते. इतक्यांत सुधाकर येतो व शान्तेला आनंद होतो. कमलेला आपल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप होऊन ती सर्वांची क्षमा मागते. कान्तही शान्तेची क्षमा मागतो. सुधाकरानें आपला स्वीकार केल्याबद्दल शान्तेलाही आनंद होतो.

हा लहानसा प्रसग इतक्या स्वाभाविकरीत्या रंगविला गेला आहे कीं नव्वद पानें केव्हां उलटलीं याचा हिशेबही रहात नाहीं. तरुणांचें प्रेम, कमलेला बरें वाटावें यासाठीं कान्ताची धडपड व हा त्रास आपल्या पतीला होऊ नये यासाठीं शान्तेला बोलावयाचा आग्रह; बरें वाटावयास लागलें म्हणजे खाण्यापिण्याचे नियम झुगारून देण्याची स्वाभाविक प्रवृत्ति, रात्रीच्या वेळी रोग्याला तपासावयास येण्यामध्ये डॉक्टरांची टगळमगळ; घरांत आलेल्या परक्या माणसामुळे प्रेमाची होणारी तोडदाबी, प्रथम अशक्य वाटणारे परंतु सहवासानें शक्य कोटींत येणारे ससारांतील प्रेमसबध; या व इतर गोष्टी इतक्या हुबेहूब रगविल्या गेल्या आहेत कीं ही कथा आपण वाचीत नसून हा प्रसंग आपल्या डोळ्यासमोरून जात आहे असा आपणांस भास होतो. तीन रंगामध्यें जसें उठावदार चित्र रगवावें त्याप्रमाणें तीनच पात्रामध्यें लेखकानें सुखपर्यवसायी प्रसग फारच बहारीनें रेखाटिला आहे.

या जगाच्या व्यवहारामध्यें—मग तो व्यवहार शाळेतील असो, कुटुंबांतील असो किंवा उघडया बजारांतील असो—एकमेकांपासून मिळणाऱ्या सूचनांचा (Suggestion) एकमेकांच्या मनावर किती परिणाम होतो, ही गोष्ट या लहानशा पुस्तकांमध्यें चांगली अनुभवास मिळते. ‘तूं दगड आहेस, तुला

कांहीं यावयाचें नाहीं ' असें शिक्षक सहज बोलून जातात, परंतु त्याचा विद्यार्थ्यांच्या मनावर केवढा परिणाम होतो. शिक्षकानें दगड म्हणावें, आईबापानें दगड म्हणावें, मुलाला वाटतें कीं खरोखरच आपण दगड आहोंत. तो प्रयत्न करीनासा होतो व शेवटीं खरोखरच तो दगड राहतो. याचे उलट ' बाबू, तुझें चित्र किती चांगलें आहे' असा शेरा शिक्षकानें दिला कीं यापुढचें चित्र त्याहीपेक्षां सरस काढण्याकडे मुलाची प्रवृत्ति होते व हळुहळु तो उत्तम चितारी बनतो. ह्याच अनुभव या गोष्टीमध्यें आपणास पाहावयास मिळतो. निर्मळ मनानें एकमेकांकडे पाहणारी शान्ता व कान्त, ' तुम्ही पति-पन्तीवत् एकमेकांवर प्रेम करा ' असें कमलेकडून सुचविलें जातांच, निराळ्या दृष्टीनें पाहूं लागतात. प्रथम दुष्ट वाटणारी कमलेची इच्छा पुढें प्रेमळ भासूं लागते. सुधाकराचा स्नेह कधींहि तोडतां येणार नाहीं असें ज्या शान्तेला वाटत होते तीच शान्ता त्याची आलेलीं पत्रें निर्दयपणानें फाडण्यास उद्युक्त होते.

दुसऱ्यापासून मिळालेल्या सूचनांचा जसा आपल्या मनावर परिणाम होतो, तसा आपल्या मनाचा आपल्यावरही परिणाम होतो, हें मानसशास्त्राचें तत्त्व या प्रसंगामध्यें गोविलेलें आहे. ' प्रत्येकानें रोज सकाळी व रात्रीं झोपण्यापूर्वी परमेश्वरचिंतन करावें, चांगलीं गाणीं गावीत व चांगल्या विचारांचें मनन करावें ' असें जे रामतीर्थ, विवेकानंद वगैरे थोर धार्मिक पुरुष सांगतात ते याच तत्त्वाचे अनुरोधानें ! ' आरशामध्यें आपलें शरीर नेहमीं पहावे व माझे दंड मोठे होत आहेत अशी सूचना आपल्या मनाशीं करावी ' असे सँडोसारखे लोक उपदेश करितात, त्याचा तरी हेतु काय ? ' मी मरणार, आतां खात्रीनें जगत नाहीं ' अशी सदैव विचार करणारी कमल, सवतीमत्सरानें पेटून ' मला सुख प्राप्त करून घेतलेंच पाहिजे, ती गोष्ट शक्य आहे ' अशी आपल्या मनाला सूचना देते व शरीराचे दौर्बल्य झुगारून देऊन थोडयाच दिवसांत खडखडीत बरी होते हा कोणत्या मोहिनीमंत्राचा परिणाम ! आपल्या ठिकाणी सामर्थ्य असतांना अमुक अमुक गोष्ट माझ्यानें होणार नाहीं असें आपण म्हणतों, हा आपल्या मनाचा कमजोरपणा आहे, हा धडा यामध्यें लेखकानें वाचकांस शिकविला आहे असें मला वाटतें.

साधा प्रसंग घेऊन थोर तत्त्व—मानसशास्त्राची पुस्तकें घेऊन कोणीही वाचावयास तयार होणार नाहीं असें तत्त्व—खेळत खेळत शिकविण्याचा जो यशस्वी प्रयत्न रा. कुळकर्णी यांनीं मालेंतील या पुस्तकद्वारें केला आहे त्याबद्दल त्यांचें मी प्रेमपूर्वक अभिनंदन करितों; व अशीच वाङ्मयसेवा रा. गोखले यांचे हातून घडो ही शुभेच्छा प्रदर्शित करून ही अल्पशी प्रस्तावना संपवितों.

पुणें, ता. ९।१२।३१ बा. ग. जगताप.

# पांचव्या वर्षाच्या अखेरीची हजेरी—

सन्मान्य आश्रयदाते,

आज आपल्या हाती पाचव्या वर्षातील शेवटची दोन पुष्पे (१९ व २०) ही एकदमच देऊन पाचव्या वर्षापुरते आम्ही आपल्या सेवे-तून मुक्त होत आहोंत. पाच वर्षांची कामगिरी म्हटले पण एवढीच काम-गिरी करावयास साडेसहा वर्षें लागलीं आहेत. मालेचे सर्व अंतस्थ मागील १८ व्या पुष्पाच्या बरोबर स्वतंत्र कळकळीच्या पत्रद्वारें आपल्यापुढें माड-लेच आहे. त्यानंतर कांहीं चागला फरक होईल व मालेला वेळच्या वेळीं कार्य करता येईल अशी आशा वाटत होती. पण ती आशाच ! ती सफळ झाली असती तर आशेला आशा हें नांव कसें देतां आलें असतें !

अजून आम्ही आमच्याकडून कुठे चुकलों आहोत असे आम्हाला वाटत नाही; पुष्पांची निवड आपल्यापुढे आहेच. बडी वर्तमानपत्रे व विचार-वंत थोर पुरुष मालेबद्दल काय व कसे बोलतात, हेंही आपणास दिसत आहेच. अशा स्थितींत मालेला वाढता आश्रय मिळूं नये, उलट तो घटतच जावा हें कोडें कांही केल्या सुटत नाहीं !

काही असो; चिकाटीनें कार्य करीत रहावयाचे एवढेच आम्ही जाणतो आणि त्याला अनुसरून अखेरपावेतो वागत राहावयाचें एवढेंच आम्हाला माहीत आहे ! मालेचें पुष्प अजून कां येत नाहीं ! उशीर कां ! आमची वर्गणी बुडबावयाचा विचार आहे कीं काय ! अशी आस्थेनें संतापून पृच्छा करणारा एक तरी सक्रीय साहाय्य करणारा आश्रय-दाता मालेला आढळतो आहे तोंपर्यंत माला चालू ठेवण्यात आम्हांला धीर आहेच ! असो.

मागील परिस्थितींत काडीमात्र बदल न झाल्यामुळेच जुलैमध्यें कादंबरी काढणे अशक्य झाले. आजही अजून तीच परिस्थिति आहे. तरी पण आज मालेचीं दोन पुष्पे एकदमच—दुसऱ्या पुस्तकाच्या वेळींच—आम्ही प्रसिद्ध करीत आहोत. अशाही परिस्थितींत श्री. नारायणराव कुळकर्णी यानीं आपली कादंबरी किती आस्थेने सर्वांग सुंदर वठविण्याचा कसून प्रयत्न केला आहे हें अवश्य पहावे. त्याचप्रमाणे मालेचे अत्यंत निकटचे सन्मित्र श्री. सदाशिव काशिनाथ गोखले बी. ए. बी. टी. यानीं प्रस्तुत गोष्टवजा छोटेखानी कादंबरी कशी बहारदार लिहून दिली आहे आणि मालेला आयुष्मान होण्यासाठी कसा सक्रिय हातभार लावला आहे हे आपणांस आढळून येईल. श्री. नारायणराव कुळकर्णी याच्या मानसिक चिंतेची छाप त्याच्या सर्व कादंबरीभर पुष्कळच पडली आहे आणि धनिकानी दुर्लक्ष केले तर अकालीं इहलोक सोडणाऱ्या त्याच्या 'माणिक' प्रमाणेच मालेचीही अवस्था होईल कीं काय, ही त्याच्याप्रमाणे आम्हासही सकारण धास्ती वाटत आहे. तेंच श्री. सदाशिवराव गोखले याच्या तरुणपणीच्या ताज्या आशावादी मनाला 'कमला-कांता'चा सुखाचा शेवट करतां आला आहे त्यावरून माला आणि तिचे आश्रयदाते याचे मनाजोगते जमेल व मालेलाही त्याच्या उभय नायिकाप्रमाणे सुखाचे दिवस दिसतील, अशी त्यांची अपेक्षा दिसते. ईश्वर पहिली चिंता वृथा करो आणि आमची अपेक्षा मूर्तरूप घेवो अशीच त्या कमलावराजवळ आमची अनन्य प्रार्थना आहे !

आश्रयदाते, मालेची गत माणिकप्रमाणें दुःखान्त करणे किंवा कमला-कान्ताप्रमाणें सुखान्त करणें केवळ आपल्या हातीं आहे. तरी तिकडे कृपा करून लक्ष पुरवावे.

आपल्याकरितां आम्ही ६ व्या वर्षाकरितां श्री. वाग्भट नारायण देशपांडे, बी. ए., एल्एल्. बी., श्री. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर, बी. ए.,

श्री. दिवाकर कृष्ण केळकर, एम्. ए., एल्एल्. बी., कुमारी राणीबाई ठकार, बी.ए., श्री. यशवंत कृष्ण खाडिलकर, संपादक 'नवा काळ', श्री. वासुदेव वामन भोळे, बी. ए., एल्एल्. बी., श्री. रामकृष्ण गोपाळ भिडे, उपसंपादक केसरी पुणे, श्री. विष्णु दत्तात्रय देशपाडे, श्री. डी. व्ही. गद्रे, बी. ए., एल्एल्. बी. यांसारख्या कुशल व कसलेल्या लेखकांचें लेखनसाहाय्य मिळविलें आहे! आम्हीं आमच्याकडून केव्हांच कसूर केलेली नाहीं व करीत नाहीं. राग मानूं नका, पण आपल्याच हातून कसूर होत आहे, मालेकडे दुर्लक्ष होत आहे तेवढें करूं नये, अशी आपल्याला सविनय प्रार्थना आहे.

माणिक व कमलाकान्त या दोन पुस्तकांची मिळून पृष्ठसंख्या मालेच्या ठरलेल्या नियमाप्रमाणें होत आहेच; आश्रयदात्यास दोन्ही कादंबऱ्या दीड रुपयातच पाठविल्या आहेत. किरकोळ विक्रीची किंमत निरनिराळी ठेविली आहे. दुसऱ्या पुष्पांत छापलेले चित्र देणाऱ्या 'प्रभात फील्म कंपनी'ची, मालेला लेखनसहाय्य करणाऱ्या श्री. सदाशिवराव गोखले याचीं आणि अनेक परीनें उपयोगी पडणाऱ्या सन्मित्रांचीं माला अत्यंत ऋणी आहे.

मालेचा आश्रयदाता वर्ग वाढो आणि मालेकडून जनसेवा अखंड चालो हीच श्रीगुरुचरणीं नित्य प्रार्थना करणारा आश्रयदात्याचा नम्र,

विठ्ठल रामचंद्र खाडिलकर

## वाचकांस—

रसिकवृंद, आपल्यापुढें माझ्यासारख्या एका नवशिक्या लेखकाला आणण्याचें धाडस **महाराष्ट्र–कुटुंब–मालेच्या** चालकांनीं करून आपल्या हातांत हा कथाप्रबंध आज दिला आहे. **महाराष्ट्र–कुटुंब–मालेच्या** आजपर्यंतच्या प्रभावळीत तो कसा काय शोभेल याबद्दल मला स्वत:ला कांहींही वाटत असलें, तरी आपण तो अुदार व थोर मनानें मानून घ्याल ही चालकांची त्यांच्या एका विशिष्ट दृष्टीनें व विशिष्ट परीस्थितींत खात्री असल्यामुळें आपणासमोर मी येअूं शकलों.

समारें तीन वर्षांपूर्वीं, माझ्या बंधूंच्या '**व्यापारी**' कादंबरीचीं टिपणें व साधनसामुग्री जुळवीत असतांना, मी या गोष्टीचीं कांहीं प्रकरणें एका अिंग्रजी नाटकाच्या आधारानें लिहिलीं होतीं. प्रथम प्रयत्नाच्या अविश्वासामुळें तीं मग तशींच अपुरीं राहिलीं होती. परंतु माझे मित्र रा. वामनराव पुरोहीत यांच्या प्रोत्साहनानें आणि महाराष्ट्र–कुटुंब–मालेचे संपादक व माझे मित्र रा. नारायण विनायक कुलकर्णी यांच्या सहानुभुतीनें तीं पुरीं करून त्यांच्याच हातीं त्याचें अुत्तरदायित्व देअून मी मोकळा झालों. माझा प्रयत्न बरा–वाअीट ठरविण्याचें काम आपलें आहे. आपण तो गोड मानून घ्यावा हीच विनंती आहे.

श्रीशिवाजी मराठा सोसायटींतील एक प्रमुख कार्यकर्ते श्री. बा. ग. जगताप, बी. अे., बी. टी. यांनीं या पुस्तकास प्रस्तावनेचे दोन शब्द लिहून दिल्याबद्दल, व रा. विठ्ठल रामचंद्र खाडिलकर यांनीं प्रकाशनास संधि दिल्याबद्दल त्या अुभयतांचे आभार मानून आपणासारख्या रसिकवृंदाच्या हातीं मी माझें पहिलें पुस्तक देत आहे.

आपला नम्र—

१० डिसेंबर १९३१

सदाशिव काशीनाथ गोरे

ऐहिक लाभालाभाची अिच्छा न धरतां
मजवर अकृत्रिम लोभ व प्रेम ठेअून
मला अिष्ट मार्ग दाखविणाऱ्या
प्रेमळ हृदयांस—

सदाशिव काशीनाथ गोखले

॥ श्रीशंकर ॥

# क म ला – का न्त



## प्रकरण पहिलें

## पहिल्या प्रवाहीं—

"आता तरी अुठाव ना गडे! किती अुशीर झाला पहावा तरी अेकदा! प्रातर्विधि अुरकायचे नाहीत का? चहा-स्नान-जेवण होअून वेळेवर कचेरी—"

"लागलीच आहे ती रोजची पाठीमागे! त्यात काय अेवढं विशेष? पण मला अिथून अुठायची बुद्धिच होत नाहीं अन् दुसरं काहीं सुचतही नाहीं! तूं अशी आजारी असल्यावर मला तरी दुसरं कामधाम कसं सुचणार? माझा जीव—माझं सौख्य—सार सारं काही तूंच आहेस! केवळ तुझ्याकरताच तर जगात जगायचं आणि तुझ्याकरताच मरायचं!"

"अिश्श्, असं काहीच्याबाहीच बोलूं नये बाअी! अन् हें असं डोळ्यात पाणीही आणूं नये गडे! अगदीं माझ्या गळ्याची शपथ आहे हं! असं जेव्हा तेव्हा वाअीट वाटून घ्यायचं नाहीं! जगात काय कुणी माणसं आजारी पडतच नाहींत वाटतं? आणखी मी सागूं का, मी काहीं अशी मध्येच मरायची नाही—"

"चूप—"

"खरंच सागते! मी मरायची नाहीं! अन् मेलेंच तर—"

" चूप म्हणतो ना ! कोमल मनाच्या तुम्हां बायकाना अितक अभद्र अन् कठोर बोलवतं तरी कसं ! ते काही नाहीं; तुला मी असं अभद्र बोलूं देणार नाहीं ! तुला माझ्याकरिता खडखडीत बरं आणि तेही अति-शय लवकर बरं झालंच पाहिजे—"

" पण मी मरायची हौस का धरली आहे ! आणि बरं व्हायचं तरी माझ्या का स्वाधीन आहे ! "

" मग कुणाच्या, माझ्या ! "

" छे, आपल्याही नाहीं आणि माझ्याही नाही ! "

" मग काय ! डॉक्टराच्या ! वैद्याच्या ! ते तर दररोज आपली शिकस्त करीत आहेत ना ! "

" तरीही पण ते त्याच्याही हाती नाही—"

" मग कुणाच्या ! तूं फारच हट्टी आहेस बघ ! दुसऱ्याला दुःख देण्यात तुम्ही बायका जो निर्दयपणा दाखवता, त्याबद्दल तुम्हाला काहींच का वाटत नाही ! साग लवकर, तूं बरं होणं कोणाच्या हाती आहे !"

" देवाच्या !"

" देवाच्या हातीं काय आहे कपाळ ! बरं होणं तुझ्याच हाती आहे—तूंच धीर सोडता अुपयोगी नाहीं—औषध वेळच्या वेळीं घेतलं पाहिजे—डॉक्टर सागतील तसं वागलं पाहिजे—पथ्यपाणी संभाळल पाहिजे. माझ्या-साठीं आणि तुझ्यावरील माझ्या प्रेमासाठी तरी तुला जगलच पाहिजे ! म्हण अेकदा 'मी बरी होणार' म्हणून !"

" बरी होणार ! बरी होणार ! बरी होणार ! आता तरी झालं का आपल्या मनाजोगं ! आता अुठायचं, प्रातर्विधि अुरकायचे. सारी रात्र माझ्या अुशाशीं बसून जाग्रण करून डोळे कसे लालभडक झाले आहेत, डोकं किती तापलं आहे नी तोड पहा कसं अुतरलंय ! माझ्याबरोबर

अिकडेही का आजारी पडायची हौस आहे ? अुठायचं म्हणतें ना मी ! माझ्या गळ्याची शपथ आहे बरं का ? तोंड धुअून येणं होअीपर्यंत मी आपल्याला चहा करून—"

"भले शाबास ! जागेवरून अुठवत नाहीं अन् म्हणे मी चहा करतें ! काहीं नको अुठायला ! माझा मी चहा करून घेअूं शकतों ! तुझ्या हातच्या चहासारखा कदाचित् मला करता येणार नाहीं पण म्हणून काहीं तेवढ्या-करिता मी तुला अुठूं देणार नाहीं ! म्हटलं, डॉक्टरांनीं सांगितलं आहे ना, जाग्यावरून मुळींच हालायचं नाहीं म्हणून—मग झालं तर !"

"बरं ! पण आता तरी अुठायचं ना ? आपला आपण का होअीना चहा करून घ्यायचा ना ? वेळेला स्नान, जेवण अुरकून कचेरींत जायचं ना ?"

"हें पहा, तें मी माझ्या सोअीसवडीप्रमाणे सर्व काहीं पाहून घेतों, त्याची नको काळजी तुला ! तू चांगली बरी होअीपर्यंत आमचं कामधाम सर्व बंद ! सिनेमा, करमणुक, हिंडणं फिरणं याचा अेकदम संन्यास !—"

"म्हणजे ?"

"अेकदा सांगितलं तेच—"

"पण लोक काय म्हणतील त्याची कांहीं—"

"फिकीर नाही मला ! जाअूं दे तें ! औषध घेणार ना आता ?"

"नाहीं. संपलं आहे औषध. डॉक्टर येणार आहेत ना अितक्यांत ?"

"अरे हो—"

"बरं पण अुठायचं ना आतां ? माझ्याकरितां अितकं करायचं पाहून मला बाअी मेल्यापेक्षा मेल होअून जातं ! कुठून मी आजारी पडलें आहे असं मला होअून गेलं आहे ! मला किनअी, अशानें भारी संकोच वाटतो ! मी लवकरं बरी व्हायला पाहिजे ना अिकडून !"

" हें काय खुळ्यासारखं विचारतेस ! "

" तर मग मी सांगतें तसं थोडंसं तरी अैकणं झालंच पाहिजे. "

" काय सांगणार आहेस तूं मला ! "

" वेळच्या वेळी जेवावं, नियमित नी भरपूर झोंप घ्यावी नी अष्टौप्रहर असं माझ्याजवळ बसून रहायचं नाहीं. ऑफिस चुकवायचं नाही."

" आणखी !—"

" आणखी पुष्कळ आहे. पण आता अुठून चहा घेतल्याशिवाय आणि सागितलं अेवढं हो म्हटल्याशिवाय मी आणखी काही अेक साग-णार नाहीं आपल्याला ! "

" पण तुझ्याजवळ कोणी नको का ! तुला अेकटीला सोडून मला दूर व्हावंसं वाटत नाही त्याला मी काय करूं ! मी पुष्कळ म्हणतो पण शरीर जागचं हलत नाही त्याला काय अिलाज ! घटके घटकेला तुला घाबरल्या-सारखं होतं, क्षणाक्षणाला तुझ्या तोंडाला कोरड पडते नी डोळे पांढरे होतात, मग तूंच साग मला तुझ्याजवळून कसं बरं दूर होता येअील ! "

" पण अशानंच माझं दुखणं अेकादे वेळीं विकोपाला जायची धास्ती आहे बरं का ! अेक माझ्या दुखण्याची मला काळजी ! दुसरी अिकडच्या अशा वागण्याची, हळव्या मनाची, हट्टी स्वभावाची—"

" हें पहा, तूं कांहीं सांगितलंस तरी मी कांहीं अैकणार नाहीं ! आतां डॉक्टर येणार आहेत ना ! ते आले की तुझ्याजवळ बसतील नी मी तेवढ्या वेळांत सगळीं कामं अुरकून घेअीन आणि मग तुझ्याजवळ येअून बसेन."

आमच्या या नवपरिणत प्रेमळ दांपत्यानें नुकताच पुण्याला येअून आनंदाचा संसार थाटलेला होता. अुभयतांच्या या संसारांत वडील माणूस कोणीच नव्हतें. पत्नीच्या माहेरचें कोणीही तिच्याबरोबर आलें नव्हते तर पतिराजांनीं, कां कोण जाणे, आपल्या भावंडापैकीं कुणालाहि आणलें

नव्हतें ! रामाचें सीतेवर आणि अुलट सीतेचें रामावर जसें अनन्य प्रेम तशीच अवस्था या दांपत्याची ! शेजारीपाजारीही त्यांच्याकडे पाहून असेंच म्हणत असत. दोघाचा प्रेमविवाह झालेला होता आणि नव्याजुन्या प्रेम-विवाहीत जोडप्याना दोघेही आदर्शवत् होती यात शंका नाहीं. पत्नीला ठेंच लागली तर पतीच्या मस्तकात कळ यावयाची आणि पतीचे डोकें दुखूं लागलें कीं पत्नी घाबरी व्हावयाची अशी दोघाची अेकात्मकता झालेली असल्यावर मग तर ती आजारी पडल्यावर तो गडबडल्याशिवाय कसा राहील ! मग त्याला कचेरी, काम, नाटकें, क्लब, पोटाचा अुद्योग किंवा मित्रमंडळींत येणें जाणें तरी कसे सुचण.

पती पत्नीवर जास्त प्रेम करीत असे कीं अुलट तिचें आपल्या पतीवर अमर्याद प्रेम होतें हे सांगणे अत्यंत अवघड असलें तरी सध्यां मात्र पत्नी-च्या आजारानें पतिराजाच्या प्रेमाची पारख स्वाभाविकच होण्यासारखी होती आणि पतिराज त्याच कसोटीला अुतरत होते. त्याना अन्नपाणी गोड लागेना कीं, धड झोंप येअीना कीं, कचेरींत जाण्यातही त्याना महत्त्व वाटेना ! रात्रंदिवस आपल्या अुशाशीं सुश्रूषेकरिता पति बसलेला पाहून कोणत्या पत्नीला गगनाधिक आनंद झाल्याशिवाय राहील ! असें आपलें कौतुक होअुं लागेल तर केवळ तेवढ्याचसाठीं कोणती गृहलक्ष्मी, खरी-खोटी का होअीना, दररोज आजारी पडल्याखेरीज राहील !

तरीही पण याचें मात्र तसे नव्हते. पत्नी आजारी असल्यामुळें हळव्या अंतःकरणाचे आणि कोमल मनाचे पतिराज खरोखरच घाबरून जाअून रात्रंदिवस पत्नीच्या अुशाशीं बसून होते.

सुरवातीचा संवाद अेके दिवशीं सकाळचा, त्याच प्रेमळ जोडप्याचा आहे हें सागण्याची आवश्यकता का आहे ? त्यांची दोघाची बोलण्याची अेकमेकांवर सारखी मात चालली होती ती मग डॉक्टरच आल्यामुळें

थाबली. डॉक्टर आले व पतिराजानीं त्याच्याकरितां खुर्ची पुढे ओढली. डॉक्टरानीं खिशातून स्टेथॉस्कोप काढला व हंसत हंसत अेकदोन प्रश्न रोग्याला व अेकदोन प्रश्न पतिराजांना विचारले. योग्य तीं अुत्तरे देअून डॉक्टराना आपल्या रोग्याजवळ बसवून पतिराज प्रातर्विधीकरिता आणि नंतर स्वतःला व डॉक्टरांना चहा करून आणण्याकरिता म्हणून तेथून अुठून आत गेले. ते परत येअीपर्यंत आजाऱ्याला धीर येअील, अुत्साह वाटेल व लवकर बरें वाटणारी आशा अुत्पन्न होअील अशाच प्रकारे डॉक्टर आपल्या रोग्याशीं बोलत बसले. दररोज बहुधा असाच प्रकार चाले. डॉक्टर रामराव समंजस, अनुभवी, प्रेमळ आणि खेळीमेळीतले होते म्हणून बरे झालें; त्यामुळेच डॉक्टर रामरावाना दररोज अेकमेकाविरुद्ध प्रेमाच्या कागाळ्या अैकून घ्याव्या लागत आणि त्याच्यात तात्पुरता तह घडवून आणावा लागे. त्यांच्या परस्परामधील प्रेमाबद्दल डॉक्टराना अत्यंत कौतुक वाटे. आजही तसेच झालें. पत्नीने कागाळी केली आणि 'नीट वागावयाला सांगा; नाहीं तर अशाने आजारी पडायला होअील' असे डॉक्टरांना सागितले, तर पतीनेंही आपल्या बाजूचे जीव तोडून समर्थन केलें. डॉक्टर रामरावानीं हंसून दोघानाही दोन अुपदेशाच्या गोष्टी सागितल्या आणि तें आपल्या दुसऱ्या अुद्योगाला गेले.

पतिराजांनीं पत्नीला औषध देअून तिच्या पथ्यपाण्याची सोय केली व नंतर स्टोव्ह व स्वयंपाकाचे अितर जिन्नस जमवून ते त्या रोजच्या अुपक्रमास लागले. पत्नीच्या आजाराच्या पहिल्या दिवसापासूनच ऑफिसला रामराम ठोकून, स्वारीनें तो प्रकार ती बरी होअीपर्यंत तसाच चालविण्याचा निश्चय केला होता.

या सर्व प्रकारामुळें तिला मात्र फारच संकोचल्यासारखें होत असे; व म्हणूनच तर, आपण लवकर बरें व्हावें अशासाठीं ती खूप धडपडत असे

पण त्यात तिचा नाअिलाज होत असे तर पतिराजाच्या डोक्यात वैऱ्यालाही न येणाऱ्या शंका कुशंका येत असत, त्याला त्याचाही अुपाय नव्हता !

त्याना वाटे आपण दूर झालो आणि मागे काही भलतेच अभद्र घडलें तर ? म्हणूनच ते तिच्या बिछान्यापासून रेसभरही हालत नव्हते. पत्नीला वाटे की, अेकसारखें आजाऱ्याजवळ बसून राहिल्यामुळे आजाऱ्यापेक्षाही जवळ बसणाऱ्याचे मन हलके, भित्रे व नाजूक होतें, तेव्हा कामानिमित्तानें आजाऱ्यापासून थोडे बाजूला झाले की तितकेच मनाला बरे वाटते व मग मन घट्ट होते म्हणून ती आपल्या परीने त्याना कचेरींत जाण्यास अगर बाहेरून फिरून येण्यास सागे; पण तिचेही काही चालत नसे. आजाऱ्याजवळ मायेच्या माणसाचा सतत खडा पहारा असल्याशिवाय भागणार नाहीं अशा तऱ्हेचे त्याचे निश्चित धोरण पाहिल्यावर तिलाही वाटे की, सासर—माहेरचे कोणी अशा वेळी आपल्या सहाय्यास येअील तर अुत्तम होअील. पण येणार कोण ? स्वतःची आअी नसल्यामुळें तिकडून निराशा व सासूबाअी न येण्यासारख्या परावलंबित स्थितीत असल्यामुळे तिकडून कुचंबणा ! अेरव्हीं अेखादी नणंद आली असती पण आता अशा वेळी ती भावजयींचे कष्ट करावयास थोडीच येणार ? आलीच तर ती भावजयीकडून आपले सोपस्कार करून घ्यावयास येणार ! मिळून तिकडूनही कोणी येण्यासारखे नव्हते ! कोणी तरी येअील अशी ठाम निश्चिती वाटल्याशिवाय ती तरी पतिराजाजवळ बोलणार कशी ?

पत्नीला प्रत्यक्ष तिचा आजार छळीत होता आणि पतिराजाना पत्नीच्या आजारातले हाल छळीत होते !

डॉक्टर रामराव परतल्यावर इझिचेअर ओढून पतिराजानीं त्यावर आंग टाकलें, पेटविलेल्या स्टोव्हवर पाणी तापत ठेवले आणि कसलेसें पुस्तक घेअून तें वाचण्याचा प्रयत्न चालविला. तिच्या मनातल्या खळबळाटामुळें

पुस्तकांतील मजकुरावर त्याचें कितपत लक्ष होतें कोण जाणे ! त्यांच्या अशा या प्रेमळ वागणुकीमुळे पत्नीला अेक प्रकारचा आनंदही होत होता व अेक प्रकारे अत्यंत दुःखही होत होते. मात्र त्या दुःखाचे कारण तिचे तिलाच कळत नसल्यामुळे तिच्या मनाची तलखी आणि शरीराची काहली अेक-सारखी होत होती.

त्याच वेळीं टपालवाल्याने ‘ सौभाग्यवती कमलाबाअी कान्त आठवले ’ या नावाचा अुच्चार करून अेक पाकीट दाराबाहेरूनच आंत भिरकावले. अुभयता पातिपत्नीचे लक्ष त्या पत्राने अेकदमच वेधले. कमल अेका कुशी-वरून दुसऱ्या कुशीवर वळली. तिने पत्र घेण्याकरिता अुठण्याचाही प्रयत्न केला पण तितक्यात कान्तच पटकन् अुठला व त्याने तें पत्र घेतलें. कमल हंसली व कान्तानें पुढें केलेले पत्र तिनें घेतले.

“ अिकडून पत्र फोडायचं झालं असतं तरी चाललं असतं ! माझ्या नावावर पत्र असलं म्हणून काय झालं ?” पत्र घेता घेताच कमल म्हणाली.

“ पण तुमचं अेकादं खाजगी रहस्य असलं तर ? ” कान्त म्हणाला.

“ अिश्श ! भलतंच काय ते ? अिकडे न कळेल असं गुपित रहस्य माझ्याजवळ कसलं असणार ? तसलं काहीं गुपित नाहीं नी रहस्यही पण नाहीं !” असे म्हणत कमलनें हातातील पत्र फोडून वाचले. पत्र तिच्या अेका जिवलग मैत्रिणीचें—शान्तेचे—होतें. कमल आजारी पडल्यापासून तिनें शान्तेला पत्र पाठविलें नसल्यामुळे, कमल आपल्या सुखाच्या संसा-रात आपल्याला विसरली अशी शान्तेच्या मनाची समजूत होअून ती आपल्या मैत्रिणीवर रागावली व त्या रागातच तिनें हें पत्र खरडलें होतें. स्वतः वाचून कमलनें ते पत्र कान्तालाही वाचून दाखविलें.

स्वाभाविकपणें त्यानंतर अुभयतामध्ये शान्तेसंबंधीं विषय निघाला. त्या वरूनच कमलनें, अशा वेळीं शांतेला आपल्याकडे बोलावले म्हणजे बरें

होईल अशी सूचना केली व ती त्याबद्दलच कान्ताला कांही म्हणणार तोंच कान्त तिला म्हणाला, " ही तुझी मैत्रीण वाटतं ! "

" हो "

" बरीच आहे की ! मैत्रिण म्हणविते आणि खुशाल हवें तसें तुला लिहिते. तूं अशी आजारी असतांना—"

"पण मी आजारी आहें हें तिला काय ठाऊक ?"

" म्हणून काय असं लिहावं ?"

" मायेच्या माणसाशिवाय असं कुणी लीहीत नाहीं नी लीहीलं तरी तसं कुणी अैकूनही घेत नाही ! शातेनं मला असं लिहिलं नसतं तरच मला राग आला असता तिचा !"

" असं का ? अितकी माया आहे का अेकमेकींवर ? "

" हो ! आम्ही अगदी जिवश्चकंठश्च मैत्रिणी आहों. माझ्यावर जसं तिचं प्रेम आहे तसंच तिच्यावर माझं प्रेम आहे–"

" अगदीं माझ्यापेक्षा सुद्धा—"

" अिश्श ! काही तरीच काय विचारणं !"

थोडा वेळ अेकमेकानीं परस्पराकडे हंसून पाहिले, पण कोणीच काहीं बोललें नाहीं. मग कमलच पुन्हा म्हणाली, " होय, शातीला चार दिवस आपल्याकडे बोलावूं या का ?"

" कां ? ती आल्याने काय होणार ?"

" मला बरं वाटेल—"

" बरं !"

" ती माझ्याजवळ बसून राहील. औषधपाणी–पथ्य–पाहील व त्या-मुळें अिकडची जरा सुटका होअून कचेरींत जायला वेळ मिळेल. तिच्या सहवासांत मला आनंदच होईल. प्रकृती झपाझप सुधारेलसं मला वाटतं."

" येअील का पण ती ? आजाऱ्याची शुश्रूषा करावयाला यायला कुणी तितकसं अुत्सुक नसतं म्हणून म्हणतो––"

" पण शान्ता तशातली नाही ! "

" तुला हवी असेल आणि बोलाविण्याबरोबर ती येत असेल तर बोलवायला माझी काही हरकत नाहीं. ज्याने तुला आनंद होअील आणि तूं आजारातून लवकर अुठशील ते करण्यात मला केव्हाही आनंदच आहे."

" मग लिहावं तर पत्र––" कमल म्हणाली.

कान्ताने ताबडतोब लेखनसाहित्य जमवून पत्र लिहिण्यास सुरवात केली. अेरवी कमलच शातेला पत्र लिहावयाची; या वेळींही काताच्या मनात तिलाच लिहावयास सागावेंसें होते पण निष्कारण तिला त्रास होअील या भितीने त्याने कमल शातेला लिही त्याच अनुरोधाने लिहिलें. पत्राचे शेवटीं कमललाच सही करावयास लावून त्याने ते शेजारच्या शामकडून पेटींत टाकविले. कमलच्या मनासारखे वागलो म्हणून कान्ताला मनस्वी आनंद झाला तर शांता पत्रदेखत येणार व आपल्या पातिराजाची खड्या चाकरींतून सुटका होणार म्हणून कमललाही फार फार समाधान वाटलें.

कमला–कान्त याच्यातील प्रेम त्याच्या अेकजीव नावाप्रमाणेंच अेकात्म पावलेले होतें.



# प्रकरण दुसरें

## शांतेचें आगमन

"शांते," बिछान्याजवळ आपल्या मैत्रिणीला अुभी असलेली पाहून कमल अेकदम गहिवरून म्हणाली, "शाते,—"

"काय कमल?"

"मला नव्हतं वाटलं, तू अगदी माझ्या पत्रासरशीं अशी येशील म्हणून! पण पत्र हातीं पडताच अगदीं विचार न करताच आलीस ना? किती ग लवकर आलीस—"

"अग नाही! किती निघायला अुशीर झाला. स्टेशनवरून गावात यायला मेला टागासुद्धां लवकर मिळेना. जिथे तिथे अडचण, जिथे तिथे अुशीर किती झाला म्हणतेस! वाटलं की कमल आजारी आहे, आपल्याला पंख असायला हवे होते नाही तर विमानाची सोय पाहिजे होती म्हणजे आता आले त्यापेक्षा किती तरी अगोदर येता आले असते."

"शाते, कित्ती ग चागली आहेस तूं?"

"तूं पण कमल तितकीच चांगली आहेस."

"नाहीं पण तूच चागली आहेस—"

"अग, पण तूं चागली आहेस म्हणूनच मी चागली आहे!"

"तसं नव्हे ग! तूंच फार चागली आहेस!"

"बरं बाअी!"

"चल, लबाड कुठली!"

"वाः! हे मात्र चागलं हं! मला चागलीही म्हणतेस आणि लबाडही तूंच म्हणतेस. मग खरं काय?" शाता तिच्याशेजारीं बसतांना म्हणाली.

शेजारीं बसताक्षणीच कमलनें शातेच्या मानेवर मान टाकली व तिला आपल्या हाताचा विळखा घातला. तिला आनंद झाला. पण थोड्याच वेळाने तिच्या डोळ्यात पाणी येअूं लागलें व ती रडायलाच लागली.

शातेने तिचे डोळे आपल्या पदराने पुसले व तिच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत म्हटले " कमल, हे काय ?"

" शाते, मी या दुखण्यातून बरी होअीन का ग ?"

" हो ! म्हणजे ? आतां मी आले आहे ना ? मी आले म्हणजे बरं वाटूं लागेल म्हणून तूंच लिहिलं होतंस ना ? मग मी आले आता तुला चागलं वाटलंच पाहिजे. बघ तर अुद्यापासून तूं खोलीतल्या खोलींत हिंडाफिरायला लागतेस कीं नाही ते ! मी तर तुला बरं करायला म्हणून आले आहे."

" होय बाअी ! पण शान्ते—"

" काय ? "

" मला अशी आजारी टाकून मध्येच जाणार नाहींस ना ? मी नाहीं गडे तुला जाअूं देणार तशी ! "

" पण मी तशी जायचीच नाही मुळी ! "

शातेच्या बोलण्याने, येण्याने व वागण्याने कमलला किती किती बरं वाटायला लागले. तिला अेकदम हुषारी वाटूं लागली. कमलशान्ते-सारख्या जीवाभावाच्या खऱ्या मैत्रिणीवाचून दुसरीकडे असा अनुभव येणें दुर्घटच !

शातेच्या आगमनाने कान्तालाही बरेच बरें वाटले.

शाता येअून कमलच्या परिचर्येचें काम तिनें आपल्याकडे घेताच आजाऱ्याच्या खोलींतून कान्ताचे ठाणे अुठलें. तो आताशा बाहेर बाहेर राहूं लागला. आता त्याला बाहेरचा कामधंदा, कचेरींत जाणें येणें सुचूं लागलें.

रुग्णपरिचर्या करावी अशी स्त्रियानींच ! शाता येण्यापूर्वी कात सदा-सर्वकाळ कमलच्या अुशाशी बसलेला असे पण त्या खोलीत सारखी स्वच्छता ठेवणे, आजाऱ्याच्या अंथरुणातील अंगावरील वस्त्रे रोज बदलणें, खोलीत आज़ाऱ्याला न बाधेल अशो पण भरपूर हवा खेळेल याकडे लक्ष पुरवणे, खिडक्याना कापडाचे स्वच्छ पडदे लावणे, फुलदाणींत ताजी, सुगंधी व हरप्रकारची फुलें आणून ठेवणे, आजारी माणसाचे आग पुसणें, त्याला हलकेच अिकडचे तिकडे वळवणें, त्याच्याशी त्याच्या कलानें वागणे न चिडेल असे बोलणे, स्वतः न रागावणे किंवा रोग्याला रागावूं न देणे हीं कामे कांताला मनात असूनही साधत नसत. पण तेंच काम शाता आल्यानंतर कसे चोख होअूं लागले ! बायकाच असलीं कामे चागलीं करतात, त्यानाच ती साधतात आणि त्यात त्यानाच यश येते ! शातेचे असेच झाले. तिच्या वागण्याने आणि वागविण्याने दुसऱ्याच दिवसापासून कमलच्या प्रकृतीत फरक पडूं लागल्याचे दिसू लागले. शातेसारखी प्रेमळ परिचारिका लाभल्यावर तसा फरक का दिसू लागणार नाही ?

परंतु शाता आल्यापासून जशा काहीं गोष्टी चागल्या झाल्या तशाच काहीं गोष्टी अडचणीच्या होअून बसल्या. नवीन सोय झाली की, त्याबरोबर तशीच अेखादी गैरसोय हटकून जन्माला येते तशातलीच स्थिति झाली ! कमल शातेच्या देखरेखीखाली गेल्यामुळें कमलला काताचा आणि कांताला कमलचा, घरातल्या घरात असूनही, दूरपणाचा विरह होअूं लागला. शाता सरळ, निर्मळ, कष्टाळू, मायाळू व सहनशील खरी पण परकीपणामुळें काताला स्वाभाविकच संकोच वाटत असे; तो तिच्याशी बोलण्याचा प्रसंगच येअूं देत नसे. अुलट शातेला काताशी बोलायची वेळ फारशी येत नसे.

शाता कमलच्या खोलींत गेली कीं, कात तेथून अुठून बाहेर येअी आणि ती कामानिमित्त जरा कुठे अिकडे तिकडे झाली कीं,

तो कमलच्या अंथरुणाशीं जाअी. कमलची ओढ काताकडे आणि काताची ओढ कमलकडे अतोनात खरी; पण आजारामुळे, डॉक्टराच्या सल्लयामुळे आणि शातेच्या प्रेमळपणाच्या कडक शिस्तीमुळे कमला-कान्त अहोरात्र जवळजवळ दूरच असत. डॉक्टर आले म्हणजे त्याच्याबरोबरच कात त्या खोलींत जाअी पण त्यानंतर तो बाहेर बाहेर असे. फार वेळ झाला म्हणजे कमललाही कसेसेच होअून जाअी. 'कुठे असायचय ग ? चहा झाला का वेळेवर ? आज तरी जेवणावर लक्ष होतं का ?' वगैरे प्रश्न कमल शातेला विचारी व तीही त्याचीं योग्य तीं अुत्तरे देअी. पहिल्या प्रथम या गोष्टी तिच्या लक्षात आल्या नाहीत पण मागाहून मात्र चाणाक्ष शातेच्या त्या ध्यानात यावयाला फारसा वेळ लागला नाहीं. कातच जर शातेशी बोलण्याचा संकोच करी तर शाता तरी आपण होअून त्याच्याशी कशी बोलणार ? सगळीं बोलणीं कशीं जितक्यास तितकींच होत असत ! 'डॉक्टर येअून गेले का ? औषध आणावयाचं नाहीं ना ?' असले कान्ताचे तुटक प्रश्न आणि त्याना शातेची तशींच तोकडी अुत्तरे असाच सगळा घरचा कारभार चालू होता !

शाता घरीं आली त्या दिवशीं टाग्यातून बॅग, वळकटी, फराळाचा डबा, फिरकीचा ताब्या इत्यादि तिच्या जिन्नसा टागेवाला अुतरून घेअून आंत आला त्यावेळीं कांताने पुढे होअून त्या ठेवावयास जागा दाखवताना आणि हास्य मुखाने शातेचे स्वागत करून औपचारिक दोन कुशल प्रश्न विचारून तिला कमलच्या खोलीत नेल्यावर मग थोडा वेळ जे काय त्या दोघातिघाचे बोलणे झाले असेल तेवढेच ! त्यानंतर बहुतेक भाषण बंदीच झाली होती !

आपल्यामुळे अुभयता पतिपत्नींची कुचंबणा होत आहे, त्याना चार दोन घटका अेकत्र बसून बोलासवरायला सवड मिळत नाहीं हें पहिल्यादा

जरी नाहीं, तरी मागाहून शातेच्या ध्यानात आले. ती विवाहीत असती तर त्या दापत्याची मनःस्थिति तिच्या डोक्यात यावयाला अितकाही वेळ लागला नसता. पण बायका जन्मजातच कांही बाबतींत शहाण्या, समंजस असतात. त्याची कुचंबणा होत आहे हें लक्षात आले तेव्हा तिचें तिलाच चमत्कारिक झालें व हंसूंही आले. कमल अितकी जिवाची जिवलग, पण तिला आपल्याजवळ तसे स्पष्ट बोलण्याचा संकोच वाटवा याचे तिला मोठें नवल वाटले. तसें ते तिनें कमलजवळ बोलूनही दाखविले तेव्हा दोघींही हंसल्या व शातेच्या गालावर कमलच्या अशक्त हाताची अेक हलकीशी लाडकी चापटी पण बसली !

पण मग शाताच मुळी मुद्दाम अुभयतांना बोलाबसवयाला वेळ मिळावा म्हणून काहीं तरी निमित्ताने बाहेर गेली कीं, बराच वेळ बाहेरच राहूं लागली व त्यामुळे त्याना बोलायला वेळ मिळूं लागला.

शाता जवळ असली की, कात जवळ अुभा रहावयाचा नाहीं कीं तिघेजण अेकच मोकळेपणानें बोलायचे नाहींत. याबद्दल कमललासुद्धां कसेसेच वाटूं लागले. पण ‘ असे तूं का वागतेस ’ म्हणून शातेला विचारण्याचे धाडस तिला होअीना व कातालाा त्याबद्दल विचारण्याचे तिला जमेना त्याचे तिला चमत्कारीकही वाटे आणि बरेंही वाटे.

काताला काय आवडते काय नाही, त्याच्या जेवणाच्या खोडी काय आहेत, कसे वाढावे लागतें, किती किती आणि किती वेळा वाढावे लागतें म्हणजे त्याचें पोट भरते,मागण्याची पाळी आलेली त्याला कशी खपत नाहीं, जेवण संपेपर्यंत वाढणारानें त्याच्यासमोर नेहमीं कसें अुभे असावे लागतें वगैरेबद्दल कमलने शातेला अगोदरच समजाअून सागितलें होते व त्याप्रमाणे शाता हुबेहुब वागत होती. पण कात मात्र जेवतांना पानांत पडे तें खाअी. काहीं मागावयाचा नाहीं, हवे किंवा नको अेवढेंच म्हणे. अिकडे

तिकडे पाहावयाचे नाही हा त्याचा नियम होता. शातेशी अुगीच काहीं तरी बोलावयाची पाळी आणावयाची नाही असेच त्याने ठाम ठरविले होते. अितकें होते तरी त्याच्या वर्तनात तुसडेपणा, बेपर्वाअी अशापैकी काही होते म्हणावें तर तसेही नाहीं. शाता आपल्या लाडक्या अर्धांगीसाठी अेवढे अविश्रात झटते याबद्दल त्याला नेहमीं कृतज्ञता वाटे व त्याबद्दल तो कमलजवळ वेळोवेळीं बोलतही होता. न बोलताही काताचे ते वर्तन शातेला कळण्या-सारखें होते !

असे असूनही शाता काताशीं किवा कात शातेशी मनमोकळेपणानें बोलत नसत, वागत नसत. शाता काताचे कमळेवरील अेकनिष्ठ प्रेम ओळखूं शकली होती. कमळेची कातावरील अनन्य भक्ति तिला अुमगली होती व त्याबद्दल तिला कौतुक, अभिमान आणि आनंदही वाटत असे. प्रसंगविशेषी ती तसें बोलून दाखवी किवा त्याबद्दल कमलची गोड थट्टा-मस्करीसुद्धा करी.

रुग्णाअिताची परिचर्या व्यवास्थित होअी म्हणून डॉक्टरही शांतेला शाबासकी देत असत. ती आल्या दिवसापासून प्रकृतींत सुधारणा होअूं लागल्यामुळे शातेविषयीच्या प्रेमळपणात कमळेच्या मनात चागुलपणाची आणखी भरच पडली. तिच्या आगमनामुळे आणि दक्ष जपणुकीमुळेच आपल्या कमलचा पुनर्जन्म होअून आपल्याला तिचा लाभ निश्चितपणें होत आहे या विचाराने कांतही शांतेशी आणखी कृतज्ञच झाला! सध्याचा घरांतील मामला असा चालूं होता.

तरीपण अजूनही घरात, अेकमेकाशीं अेकमेकाचा पक्का आदरभाव, सद्भावना आणि निर्व्याज प्रेम असूनसुद्धा, परस्पराशीं अेकमेक चोरट्या-चोरट्याप्रमाणेंच वागत असत ? आणि हें असे का होत होते तें कोणाला स्पष्टपणे कळून येत नव्हतें हे विशेष ! असो.

दुपारीं जेवणखाण करून कांत कचेरींत गेला म्हणजे दोघीजणी बोलत बसत असत. अशाच अेकादे वेळी शांता अकारण अुदास किंवा सचिंत दिसली कीं कमलचा जीव खालीवर होअूं लागून ती म्हणे, "शांते, माझ्या घरीं तुला किती ग काम पडते!"

"अग पण मी त्याचसाठीं आले आहे ना!" शांता तिला अुत्तर देअी.

"पण तूं किती दमतेस!"

"मुळीच नाहीं."

"तर–तर! दमत नाहीस मग आज अशी अुदास का दिसतेस तूं? सचिंत का आहेस?"

"कधी, केव्हा? कुठे? छे, मुळीच नाहीं. तुलाच आपलं तसं काही तरी वाटतं झालं!"

"शांते, खरं सांग हं! लपवालपवी नको. तुला घराकडची का आठवण होत आहे?"

"होय गडे!"

"केव्हा बाअी अेकदा देव मला बरं करतोय आणि तुमच्या सर्वांच्यावरचं संकट दूर करतो आहे तोच जाणे! शांते, आमच्या अिथं तुला कंटाळा नाही ना येत? कसला त्रास नाही ना होत?"

"असं ग काय कमल? तूं बरी झाल्याशिवाय मला कंटाळा येणार नाहीं नी कसला त्रास पण होणार नाहीं हो!"

केव्हा दोघी मैत्रिणींचे असे बोलणे होअी तर केव्हां कांताचा विषय निघून कमल आपल्या सखीला विचारी, "शांते, तिकडच्या स्वभावाबद्दल तुला काय वाटतं?"

"म्हणजे? कांताचा स्वभाव भारीच अुत्तम आहे हो!" शांता तिच्या प्रश्नास मोकळ्या मनाने आणि सहजपणे अुत्तर देत असे.

" बरं ! आता माझ्याबद्दल तुला काय वाटतं ! "

" कांतासारखे पति मिळाल्याबद्दल मी तुला नेहमींच फार भाग्यवान् समजते. मी तर म्हणतें, तुमच्याकडे पाहून अेकाद्या अप्रबुद्ध स्त्रीला तुमचा हेवासुद्धा वाटायचा ! कातासारखे पति—"

" अन्, तुझ्यासारखी जिवाभावाची मैत्रिण मला आहे हेही माझं तितकंच भाग्य आहे बर का ! शाते, मनासारखा जन्माचा सोबती आणि तुझ्यासारखी जिवाभावाची मैत्रिण लाभणं महाकर्म कठीण आहे बरं ! त्याला पूर्वजन्मींचं तसंच भाग्य असावं लागतं ! खरंच मी किती भाग्याची आहे ! पण शाते, माझ्या दुर्दैवानं मला अशी आजारी पाडून माझ्या भाग्याच्या सुखावर दुःखाचा कसा भिब्बा घातला आहे बघ ! "

" अग पण, होशील हो आता तूं लवकरच बरी ! हें बघ, मी आल्यापासून तुला किती तरी बरं वाटलं नाहीं का ! मग आता का अुगाच मनाला हे लावून घेतेस ! अशानं काताना तरी बरं वाटेल का !"

" खरंच बाअी, शांते—"

" मग पुन्हा असं मनातही आणूं नकोस काहीं ! तुला अेकदा केव्हां बरं वाटूं लागेल आणि मी यश घेअून परत जाअीन असं झालं आहे "

" कंटाळलीस वाटतं अितक्यातच मला !"

" तसं नव्हे ग पण —"

" पण काय ! तिकडून तुझ्याशीं बोलणं होत नाहीं, तुसड्या तुसड्यासारखं वागायचं म्हणून का तुला तसं वाटतं !"

" अिश्श ! हे काय विचारतेस तूं, कमल ! मी असं कधीं म्हटलं आहे का बरं !"

" पण शाते, तूं तिकडच्याशी बोलत का नाहींस ! तुम्ही दोघेजणं अरशी अिथं बसून आपण सर्वजण खेळीमेळीनें बोलूं या कसे !"

“ पण मी कधी नको म्हटलं आहे ? पण गडे, कातांना माझ्याशीं बोलायला संकोच वाटतो त्याला मी काय करूं ? मी होऊनच त्यांच्याशीं बोलण्याचा कसा धीर करू ?”

“ तुझ्याप्रमाणंच तिकडेही वाटत असतं ! पण शाते, तिकडच्या अशा वागण्याबद्दल तुला रागबिग तर येत नाहीं ना तिकडचा ?”

“ मुळीच नाहीं. राग का म्हणून येईल ?”

याप्रमाणे त्याचे बोलणे होई, तर शातेसंबंधाने काताजवळ बोलताना कमलला असेच वाटे. कात जवळ येऊन बसला म्हणजे कमल शांतेचा विषय मुद्दाम काढून म्हणे, “ शाता किती किती चागली आहे नाहीं ?”

“ यात काय शंका !” तिला उत्तर मिळे.

“ ती आली म्हणून बरं झाले नाहीं का ?”

“ तिच्या श्रमाचे चीज म्हणजेच तुझा पुनर्जन्म, नव्हे का ! आपल्या दोघाच्या चामड्याचे जोडे करून तिच्या पायी घातले तरीही तिचे आपल्या वरील उपकार फिटावयाचे नाहींत.”

“ मला अशी मैत्रीण—”

“ लाभली आहे म्हणून तूं भाग्यवान् आहेस खरी ! ”

“ पण तिच्याबद्दल आपल्याला काय वाटते ? ”

“ ती तुझी मैत्रीण आहे म्हणून मला अत्यंत पूज्य आहे—खरोखरच वंदनीय आहे ती ! ”

“ खरंच हे ? ”

“ अगदी खरं ! तुझ्या गळ्याची शपथ ! ”

“ मग आपण तिच्याशीं असं तुसडेपणानं, तुटकपणानं नी बेपर्वाईनें कां वागायचं ? तिच्याशीं बोलायचं का नाहीं होत ? ”

“ म्हणजे ? ”

" हो, खोटं म्हणतें की काय मी ? ती अिथं असली कीं बाहेर का बसायचं होतं ? आपण सगळीजणं अेकत्र बसून बोलाय–सवरायला, हंसण्या-खेळण्याला काय हरकत आहे ? "

" म्हणजे काय ? मी हा असा वागतों म्हणून तुला चमत्कारिक वाटतं ? माझ्या वागण्याला तूं तुसडेपणा, तुटकपणा, बेपर्वाअी अशी नावं देतेस ? "

" मीच काय पण शांतासुद्धा अगदी तसंच म्हणते हो ! "

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ! घरातल्या घरात चोरट्यासारखं वागायचं, कुणी कोणाशीं बोलायचं नाही, अशाला शांता तर अगदीं कंटाळली आहे. तिला परत केव्हा जाअीन असं झालं आहे. तिच्याशीं बोलणं नाही, तिच्या श्रमाचं चीज नाहीं, केल्याचं वळ नाही नी—"

" पण हा माझ्या वर्तनाचा विपर्यास आहे नुसता ! तिला माझा अुद्धटपणा दिसूं नये, पुरुषाचा कोडगेपणा तापदायक होअूं नये म्हणून तर मी मुद्दाम असा वागतो. अशाही माझ्या वर्तनाचा विपर्यास झालाच का शेवटी ? शिकस्त आहे आता ! आम्ही जगात कसं वागावं हेच आम्हाला मुळीं कळत नाहीं ! आणखी खरं सागूं का तुला, तुझ्याखेरीज अन्य कुणाही स्त्रीकडे पाहूं नये आणि बोलूंही नये असं मला वाटतं, त्याला मी तरी काय करूं ? बोलूनचालून आम्हा पुरुषांची जात ! काहींही केल्यानं मन स्वाधीन काहीं रहावयाचं नाहीं, हें अगदी स्पष्ट सागतों तुला ! शांता तुझी मैत्रीण ! आम्ही बोलूंचालूं लागलो तर नातं मेहुणीचं लागायचं, थट्टामस्करी व्हायची, मग तें तिला खपायचं नाहीं नी मला आवडायचं नाहीं ! त्या निर्मळ मनाला निष्कारण त्रास ! आणि आम्हां पुरुषांच्या हलक्या मनाचं फुकट प्रदर्शन व्हावयाचं ! कोणी सहज थट्टेने जरी अुणा-अधिक शब्द बोलला तरी त्याचा नसता विपर्यास व्हायचा–घराचा कावला

बनायचा–आणि हैक म्हणता ब्रम्हहत्त्या व्हावयाची ! म्हणून अगोदरपासून असा सावधगिरीनें वागत आहे तर हीही चूकच ठरविलीत तुम्ही माझी ! ”

काताने अशा रीतीने आपल्या वर्तीनें घरातील आपल्या वर्तनाचा अेक दिवस असा स्पष्ट खुलासा केला !

काताने खुलासा केला तेव्हा कमलला त्यामुळें किती तरी बरें वाटले ! त्याच्यावरील तिची भक्ती दुणावली, प्रीति याचमुळें किती तरी पटीनें तेव्हापासून वाढली. नंतर प्रसंगाने कमलने शातेजवळ हें सर्व सविस्तर सागितले तेव्हा शातेला त्याची खूपच गमत वाटली; व त्याबरोबरच कमलच्या विचित्र स्वभावाचे मात्र तिला फार फार आश्चर्य वाटले.



## प्रकरण तिसरें

# शांतेची आतुरता!

कमळेला भराभर आराम वाटूं लागला. खोलीतल्या खोलींत व नंतर घरात ती थोडी हिंडूं फिरूं लागली तसे शातेला परत जावेसे वाटूं लागले. ती तो विषय वारंवार कमलजवळ काढूं लागली तर अुलट कमल तिच्या निघण्याची गोष्टच काढीना. शातेने आणखी काही दिवस राहावे, आपल्याला चागले बरे वाटूं लागल्यावर आपण हौसेसारखे तिला काहीं करावे व मग तिला धाडावी असेच कमलला वाटत असे. जाण्याची गोष्ट निघाली कीं, हटकून कमल तो विषय बदलावयाची! अेकदा दोनदा तर शातेनें आपल्या घरीं आपण येणार म्हणून पत्रेसुद्धा लिहावयाला घेतली पण कमलने तीं तिला धड लिहूंच दिलीं नाहींत. अुलट अर्धवट झालेलीं पत्रें तिने फाडून टाकलीं; जीं लिहिलीं तीं पोस्टाच्या पेटींत पडूं दिलीं नाहींत मग शाता काय करणार!

शातेच्या घरीं तिची वृद्ध आअी आणि कॉलेजात तिचा अेक वडील भाअू–तिचा मधुकरदादा–अेवढींच तिचीं आवडतीं–आपलीं माणसें होती हें कमलला माहीत असल्यामुळेंच, आपण आग्रहानें शातेला आणखी काहीं दिवस आपल्याकडे ठेअून घेतलें तरी त्याबद्दल तिची आअी किंवा तिचा भाअू आपल्यावर खात्रीनें रागावणार नाहींत असा त्याच्याविषयीं तिला भरंवसा होता आणि म्हणूनच ती तरी तसा आग्रह शातेला करीत होती.

आपल्या आवडत्या माणसाकडे जाअून राहाताना बरें वाटतें पण तेथून निघताना मात्र आग्रहामुळे जीव अगदीं मेट्टयास येतो. तेथील मंडळी काहीं सुखेपणानें सोडीत नाहींत, आज अुद्या करतात. तितक्यातूनही बळ-

जबरीने निघावे तर कोणी गाडी चुकवितो, कोणी कांहीं जिन्नस लपवून ठेवतो आणि थट्टा–मस्करीने जीव रडकुंडीस येतो. सध्या अगदीं तशीच स्थिति शातेची कमलच्या घरीं झाली होती.

जाण्यासंबंधानें शाता जरा थोडी चिडल्यासारखी होऊन बोलूं लागली म्हणजे कमल तिला म्हणे, "काय ग शाते, तुला ठेवून घेतें म्हणून तुझी आओी रागावेल की भाऊ ओरडेल माझ्यावर ! आणखी कोणी काही म्हटलें तरी मी त्याची समजूत काढीन !"

"आओी रागावणार नसली आणि मधुकरदादा काही बोलणार नसला तरी मी कांहीं आता राहाणार नाही. जाणार म्हणजे जाणार !"

"कां ?"

"त्याच्याशी तुला काय करायचं आहे ? मी आले, तुला बरंही वाटूं लागलं. झालं माझं काम ! आता मी जाणार !"

"आओीबद्दल नाहीं, मधुकराबद्दलही नाही, तर काय ग आमच्या शाताला ओेकाद्या सुधाकराने तर आपल्याकडे ओढ लावली नाहीं ना ?"

"चल चहाटळ कुठली" अशा वाक्यानेच दोघींच्या संवादाचा शेवट होओी. नंतर जाण्याचा विषय तितकाच थाबे.

शेवटीं हो ना करता करता ओेकदांचे शातेचे ओेक दोन दिवसातच जाण्याचे व त्याप्रमाणें तिनें ओेक आगाऊ पत्र टाकण्याचें ठरले. काताची परवानगी मिळाली, कमलनें रुकार दिला व त्यामुळे शातेलाही आतां शांतता लाभलीशी वाटूं लागले. अुरलेल्या चार दोन दिवसात दोघी मैत्रिणींनीं अगदीं मनमुराद हंसून खेळून, चैन करून वेळ घालविण्याचें ठरवून टाकले व त्याप्रमाणें त्या वागूंही लागल्या. त्याच्या कोणत्याही गोष्टीला कात अडथळा करणे शक्यच नव्हते ! आणि तो तरी तसा अड-थळा का आणील ? कांतही साहजीकपणे शांतेशीं जरा बोलूं लागला होता

व शाताही त्याच्याशीं अुलट बोलूं धजत होती. कमला, कान्त आणि शाता अेकत्र बसले म्हणजे त्याच्यात थोडासा थट्टाविनोदही होअूं लागला होता व त्याचे श्रेय बहुतेक कमललाच होते. पण हे सर्व शाता आपल्या घरी परत जाण्याची वेळ आली तेव्हा घडूं लागले. तथापि कोणालाही त्यांत फारसें चुकल्यासारखें वाटलें नव्हते.

कमला नुकतीच आजारातून अुठली होती–नव्हे खरे सागावयाचे म्हणजे ती नुकतीच कुठे अुठत होती–डॉक्टरानी चार दिवसापूर्वीच प्रत्यक्ष येण्याची जरूरी नाही असे सागितले होते.

शाता परत जाणार म्हणून तिच्या आवडीचे व आपल्याही रुचीचे पदार्थ कमल करवूं लागली. दुखण्यातून अुठल्यामुळे तिची अन्नावर जास्त वासना जाअूं लागली. आवडते पदार्थ करावयाचे आणि ते हवे तितके खावयाचे असे तिने चालविले. तिला नको कोण म्हणणार? आजारातून अुठल्यावर सर्वांनाच असे होते पण त्यावेळीच जरा जास्त जपून वागावे लागते, संभाळूनच खाणे पिणे ठेवावे लागते; नाहीं तर अशाच वेळीं वागण्यात थोडे कुठें अिकडे तिकडे झाले तर आजार हटकून अुलटण्याची भीति असते आणि तसा तो अेकदा का अुलटला म्हणजे त्याचे परिणाम काय होतील आणि काय नाही याला सुमारच नसतो! अशाच वेळी अुलटलेल्या दुखण्यात रोगी दगावण्याची धास्ती असते. यावेळीं डॉक्टर-वैद्य हेंच सागत असतात. अशा वागणुकीची जबाबदारी आजाऱ्यावर आणि घरातील अितर माणसावर असते हे पुष्कळाना समजते पण अुमजत मात्र नाहीं. पुष्कळ शहाण्यासुर्त्यांचीही अशा वेळीं फसगत होते आणि हातात आलेला रोग आणि रोगी कायमचा हातातून जातो.

कमळेनें अेक दिवस आपला अेक आवडता पदार्थ करवून शातेला आग्रह करकरून खाअूं घातला आणि आपणही मनमुक्त पोटभर खाल्ला;

दिवसभर हंसणे खिदळणें, घरातल्या घरात अुगीचच अिकडून तिकडे पुष्कळसें हिंडणेही झाले. त्याच दिवशी गार पाणी पिण्याचीही तिला बुद्धि झाली व स्वयंपाकघरात पोतेरे घातल्याची ओल होती तेथेच शाते-जवळ येअून किती तरी वेळ कमल बसली. दिवसभर त्याबद्दल काहीं कुणाला वाटले नाही. काताला तर काय कमल खणखणीत बरी झालीच ही खात्री वाटूं लागल्यामुळे ती वागते हे बरोबरच, तिच्या वागण्यात आणि आपल्या वागविण्यात काडीमात्र चूक नाहीं अशाच थाटात तो वागत होता. अलिकडच्या अननुभवी तरुण तरुणींचे सुरुवातीला वागताना अगदी असेच होत असते !

रात्र झाली व त्या वेळींही कमलने भूक नसताही आणखी काहीं तरी खाल्लेच. पण मग मात्र तिला जरा थकवा वाटूं लागून आगावर थंडीचा किंचित् काटा येअूं लागला. कबर दुखल्याचाही भास होअूं लागला म्हणून ती मग अंथरुणावर लवकरच जाअून पडली. तिची अस्वस्थता पाहून कातही मग गप्पा मारण्यास तेथे येअून बसला नाहीं आणि शाताही आपल्या बिछान्यावर जाअून आडवी झाली !

शातेला लवकर झोप येणे शक्य नव्हतें. तिचे जाण्याचे दिवस जवळ येअूं लागले होते. दुसऱ्याच दिवशी ती घरीं पत्र धाडणार होती. तिला आता घराची ओढ लागून आअी आठवत होती, मधुकरदादा डोळ्यापुढे येत होता, आणखी—आणखी—हो आणखीसुद्धा तिला अलीकडेच आवडते होअूं घातलेले अेक माणूस तिच्या चित्तचक्षूंपुढें पुन्हा पुन्हां येअूं लागले होते. तिच्या हृदयाला आठवणीनें गोड गुदगुल्या करीत मनाला अेक-सारखी ओढ लावीत होते ! होय ! शातेचे अेका तरुणावर प्रेम जडत चाललें होतें. तो सुधाकरच होता व तो तिच्या भावाचा—मधुकराचा—गुरुबंधु होता. त्याने आपले हृदय शातेपुढें व्यक्त केले होते पण शातेने

त्याला अजूनपर्यंत नाहीं म्हटले नव्हते आणि होयही म्हटलें नव्हते. त्याच्या बाबतींत तिचा अेक निश्चय अजून व्हावयाचा होता तरीही तिला सुधाकर नकोसा मात्र वाटत नव्हता! अेकमेकाची पत्रोपत्रीं, गाठीभेटी, हिंडणे फिरणे, बोलणी–चालणीं सुरूं झालीं होती. अशाच वेळीं—आपल्या प्रेमाचे रोपटे हृदयाच्या भूमिकेत लावून त्याला सहवासाचे खत, मधुर वाक्प्रवाहातील निर्मळ जळ घालण्याच्या वेळीच—तिला तांतडीने कमलच्या आजाराचें वृत्त कळतांच यावे लागल्यामुळे सुधाकर मध्यंतरीं तिला तितकाच दूर झाला होता. आणि अिकडे येताच कमलच्या प्रकृतीचा भरंवसा वाटेपर्यंत ती आपले पूर्वीचे सर्व जग विसरून गेली होती असे म्हटले तरी चालेल.

पण परत जाण्याचा वेध मनाला लागल्यापासून मागील अेकेक गोष्टी तिला आठवूं लागल्या होत्या. पडल्या पडल्या तिच्या मनात आज तर त्या जास्तच येत होत्या. कमळेचे तिला पत्र आले त्या वेळी घाअीघाअीने निघतांना धडपणें सुधाकराला ती भेटलीही नव्हती! तो तिच्या घरी आला नव्हता व तिलाही त्याच्याकडे जाण्याअितकी फुरसद नव्हती. तिने आअीला विचारले, मधुदादाला सागून त्याच्याच जवळ सुधाकराला द्यावयासाठीं अेक बोटभर चिठ्ठी लिहून दिली आणि तात्काल ती घरून निघाली होती. कमल आजारी असून तिने आपल्यालाच बोलावले आहे हे वाचून त्याच विचाराचा जबरदस्त पगडा शातेच्या मनावर बसला होता. तिनें स्वतःच्या सर्व गोष्टी अेका बाजूस सारून, केवळ कर्तव्याच्या जाणीवेनेंच ती अिकडे अशी तडक निघून आली होती.

पण आता तिला परत आपल्या घरीं जावेसे फार फार वाटूं लागलें होते. जाण्याचें ठरलें तेव्हा तिकडची अेकेक गोष्ट तिचें चित्त वेधूं लागली. दिवसभर कमलबरोबर ती हंसली बोलली. तिला काहीं पदार्थ करून घातले,

कातार्शी मोकळ्या मनाने थट्टाविनोद केला, सगळ्याची करमणूक केली आणि अंथरुणावर पडल्यावर आता मात्र ती आपल्या स्वतःच्या सुख-दुःखाकडे वळली होती.

शातेने कमलला आपल्या सुधाकराविषयींचे गोड गुपित अजून सागितले नव्हते. अेक तर कमलच्या आजारामुळे तसल्या गोष्टी बोलण्यास वेळच नव्हता आणि दुसरे असे कीं सुधाकराच्या विषयींच्या विचारान अजून तिच्याच मनात परिपक्वता यावयाची होती. मग ती त्याबद्दल कशी बोलणार ! मैत्रिणी मैत्रिणी बोलताना कमळच्या तोंडीं शातेच्या सुधाकराचे जे नाव काल्पनिक म्हणून निघालें होते ते मात्र अगदीं खरेखुरे होतें! ती अेक काकतालीय न्यायाची म्हणा अगर दुसऱ्या कशाचीही म्हणा पण अेक गमतीची गोष्ट झाली होती खरी ! असो.

शाता अंथरुणावर पडली होती. बाहेर झिम्‌झिम् पाअूस सुरूं झाला होता. बाहेरचा पाअूस शातेला प्रसन्नही करीत होता आणि बदलत्या विचाराबरोबर अप्रसन्नताही आणित होता. अपरात्रीं तिला कुठें बाहेर जावयाचे नव्हते. पावसामुळें हवेत अेक प्रकारचा गोड गारठा अुत्पन्न झाल्यामुळें तो तिच्या अंगाला झोंबून तिला पायथ्याचे पाघरूण घ्यायला सागत होता तर तिच्या मनातले विचारचक्र त्याकडे दुर्लक्ष करायला लावीत होते. आता रात्रीं येअीना का पाअूस—पण अुद्या जाताना त्याने बंद व्हावे, आपल्या जाण्यात त्याचा अडथळा होअूं नये, असे मात्र पावसाच्या पाण्याचें वळचणींतून टिबकणे अैकताना शातेच्या मनात पुन्हां पुन्हा येत होते. तिच्या स्वतःच्या अभ्यासाबद्दल, परीक्षेबद्दल, आअीच्या प्रकृतीबद्दल, मधुकराच्या सुट्टीबद्दल, स्वतःबद्दल आणि सुधाकराबद्दल असे आलटून पालटून तेच तेच विचार तिला रमवीत सुखवीत होते आणि क्वचित् तापदायकही होत होते.

त्या वेळी तिला तसेच कोणी अगदी काळजाला हात घालून विचारले असतें तर तिच्या मनात येणारे, आलेले, येत असलेले विचार तितक्याच हळुवारपणे तिने कापऱ्या आवाजात का होईना पण पुढीलप्रमाणे खात्रीने सांगितले असते—

‘ आपल्याला कमलच्या घरी येऊन किती तरी दिवस झाले ! आपल्या-बद्दल आई काय म्हणत असेल ! मधुकरदादा घरात बोलासवरायला कोणी नाहीं म्हणून रागवावयाच्याच बेताला आला असेल ! सुधाकर काय म्हणत असतील—ही आपली गेली तिकडेच रमली. आपल्याला शांता विसरलीही असेल ! बायकांचे मन ब्रह्मदेवालाही समजावयाचे नाहीं. स्त्रियांच्या मनाचा ठाव कोणाला कधीच लागावयाचा नाही ! आपल्या बोलण्याने आणि वागणुकीने त्या उगीचच एकाद्याला आपल्या लहरीखातर ळळा लावतात आणि लहर संपली की, तसेंच त्याला अधांत्री सोडून आपले मन दुसऱ्याच कसल्या तरी विषयात खुशाल रमूं देतात. बायकांवर विश्वास ठेवणारा, बायकांचे आपल्यावर निस्सीम प्रेम आहे असे समजून त्याप्रमाणे वागणारा, आणि त्यांच्याच तालावर नाचत राहाणारा मूर्खांतला मूर्ख—अजागळा-तला अजागळच—समजला पाहिजे ! शांतेने आपल्या वर्तनाने आपल्याला गोड चटका लावला आणि ती तशीच गेली. गेल्यापासून आपल्याला तिचे पत्र नाही, चिठ्ठी नाहीं कीं निरोप नाही, मग येण्याची तर गोष्टच नको ! शांता आत्ताच इतकी निष्ठुर कशी बनली ! इतकी दुष्ट का झाली ! तिचे जर पत्र नाहीं तर आपण तरी तिला काय म्हणून पत्र लिहावें ! आपली जर तिला जरूर नाही तर आपण तरी उलट तिची गरज का बाळगावी ! शांता जर आपल्याशीं खोटे बोलते तर आपण तरी तिच्याशी खरे कां वागावें ! जशास तसे या न्यायाने आपण का वागूं नये ! तशा वागणुकीनें कोणताही अपराध आपल्याकडे येत नाही !—’

आपल्याबद्दल सुधाकर अशाच तऱ्हेचे विचार करीत असेल असेंच पहिल्या प्रथम शातेच्या मनात येअूं लागले आणि साहाजिकच ती त्यामुळें लगेच अगदीं अस्वस्थचित्त होअून गेली.

विचार बदलावेत म्हणून ती अेका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळली आणि खरेच त्याबरोबर तिचे विचारही लगेच बदलले. अेक तऱ्हेनें पहिल्या विचारानी अेक टोक गाठले होतेच आणि त्या ओघाची दिशा बदलण्याची वेळ आलीच होती व त्याप्रमाणे ते बदललेही.

आता तिच्या विचाराची दिशा अशी होती—

' सुधाकर अितके निष्ठुर, कठोर, दुष्ट क्षणाक्षणाला विचार बदलणारे, व आपल्याविषयी विकल्प मनीं आणणारे खचित नाहींत. नावासारखाच त्याचा स्वभाव धीर गंभीर व स्थिर आहे. आपण अिकडे का आले, का राहिलो,हे त्याना पूर्णपणे माहीत आहे. अिथून पत्र पाठविणे कसे अडचणीचे—गैरसोअीचे आहे, याचीही कल्पना त्याना नसेल असे नाही.मी मैत्रिणीकरिता आस्थेने, प्रेमाने झटते सवरते व तशीच धावूनही आले याबद्दल सुधाकराना समाधान होत असेल, आनंदच वाटत असेल, अेक प्रकारचा अभिमान सुद्धां सुधाकर माझ्याविषयीं बाळगीत असतील. अिकडून परत घरी गेल्यावर सुधाकर आपल्याला अिकडच्या अितःथंभूत हकिकती विचारतील व अुलट आपल्यालाही त्या तशा सविस्तर सागाव्या लागतील. पण त्या सगळ्या अैकून त्याना काय बरे वाटेल ? ते काय म्हणतील ? त्याबद्दल आपल्याला शाबासकी देतील कीं निव्वळ आपली चेष्टाच करतील ? शाबासकी मिळाली कीं आपल्या मनाला तितकंच हायसं होअील, पण—पण—चेष्टा केली तर—तर काय ? आपल्याला किती तरी राग येअील. आपण मग त्याना काय काय बोलूं ? मित्रांनी आपल्या मित्राच्या, मैत्रिणींनी आपल्या सखींच्या वेळीं—प्रसंगी अुपयोगी पडावयाचे नाही तर मग त्या मैत्रीचा अगर स्नेहाचा

अुपयोग तो काय जगात ! आणि असं अुपयोगी पडण्याबद्दलच जर कोणी —त्यांतूनही आपल्या सुधाकरांनीं—आपली चेष्टा केली तर त्याबद्दल आपल्याला बरं तरी कसं वाटेल !—'

'—पण सुधाकराना मुळीं माझ्याबद्दल तसं वाटावयाचंच नाही. ते माझी चेष्टाही करणार नाहीत. मी त्याना स्वतंत्र पत्र लिहिले नाहीं म्हणून कदाचित् ते थोडेसे रागावतील पण मी समक्ष सर्व वस्तुस्थिति समजावून सागितल्यानंतर त्याचा माझ्यावरील अुरला सुरला रागही पण निघून जाअील. आणि मी त्याना स्वतंत्र पत्र पाठविले नाहीं तरी मधुदादाला वरचेवर पत्र लिहितेच ना ! तो त्याना सर्व मजकूर सागत असेलच ! मग सुधाकर माझ्यावर का रागावतील ? '

' खरेंच, आपण त्याच्या सहवासात किती सुखी होअूं ! आज आपल्या पुढें कमला–कान्ताचा आदर्श आहे, त्यांच्या अितके आपण सुखी होअूं का ! कात जसे कमलकरिता धडपडतात, झटतात, तळमळतात, तिला प्राणापलीकडे जपतात, जरा अेवढे तेवढे काहीं झाले कीं त्याचा जीव तिच्यासाठीं खालवर होतो, कमलच्या ठेंचेने कान्ताच्या डोळ्यांत पाणी येते, तसंच माझ्याबद्दल सुधाकराना वाटेल का ! ते माझ्याशी असं अित-क्या प्रेमानं वागतील का ! माझं सुखदुःख ते पाहातील का ! कमलअितकं भाग्य मला मिळेल का ! काताच्याप्रमाणे प्रेमी सखा मलाही लाभेल का ! माझे सुधाकर मला अेवढ्या भाग्याची करतील का !—'

हे आणि असेच अनेक विचार शातेच्या मनात आज किती भरभर येत होते. सुधाकर आपल्याशीं वाअीट रीतीनें वागतील असें तिचें मन वैरी बनून तिला अेका क्षणी सागे तर दुसऱ्याच क्षणीं तिचे आशावादी मन, आपण कमला–कान्तापेक्षांही अधिक सुखी होअूंच होअूं, अशी तिला बेधडक ग्वाही देअून सुखी करीत असे.

असे हे अनुकूल विचार मनात घुटमळूं लागले म्हणजे अर्थात् तिला बरे वाटून ती सुखाचा अेक दीर्घ श्वास सोडी व पुनः या कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळे किंवा मध्येच अंथरुणात अुठूनसुद्धा बसत असे. सुख-दुःखातील कोणत्याही विचारा-विकाराचा अंमल मनुष्यमात्रावर जबर असल्यावर कोण काय करणार !

शातेची आजची मनःस्थिति तरी अेकाद्या निद्रिस्त ज्वालामुखीसारखी दिसत होती. तो जसा बाहेरून शात–गंभीर दिसतो पण त्याच्या अतर्यामीं तप्तरस ओतप्रोत सळसळत असतो तसेच शातेचेही होते. तिचे नाव शाता, ती वरून दिसतही असे शात; पण तरुण वय आणि जगाकडे पाहाण्याची दृष्टिही निराळीच ! शिवाय दृष्टीसमोर कमला–कान्तासारखे अनुपमेय व हेवा करण्यासारखे प्रेमळ जोडपे ! स्वतःच्या आवतीभंवती सुधाकरासारखा अेक प्रेमी जीव, आपल्या जन्माच्या सोबतीच्या अिच्छेने सतत वावरत असलेला ! मग बाह्यतः शाता कितीही शात–गंभीर दिसत असली तरी तिच्या अंतरगी काय हलकल्लोळ माजला असेल हे कोण कसे वर्णन करणार !

रात्र बरीच झाली होती. खोलीतील दिवाही केव्हाच बारीक करून ठेवला होता. अथरुणात नुसते अुठून बसण्याचाही शातेला कटाळा आला होता. अनुकूल विचार शातेच्या खवळलेल्या मनाला शात करूं पहात होते. तशातच बाजूच्या अुघड्या राहिलेल्या खिडकीतून, लावलेल्या पडद्याला न जुमानता, गार वाऱ्याची झुळूक आत शिरून शातेच्या आगाला झोंबून जाअूं लागली होती.

आअीला आणि त्याबरोबरच सुधाकराना सकाळीं अुठल्याबरोबर पत्र लिहून आपण येणार असल्याबद्दलची आगाअू वर्दी त्याना दिली म्हणजे त्याना बरे वाटेल व त्या योगाने सुधाकरही आपल्याला अुतरून घेण्यासाठी स्टेशनवर खात्रीनें येतील असे सुखदायी विचार शांतेच्या मनांत येअूं लागले. तिला

अुठून खिडकी बंद करण्याचाही कंटाळा आला होता. पडल्यापडल्याच अेका पायाच्या आंगठ्यानें व त्याच्याजवळच्या बोटानें पायथ्याचे पांघरुण हलकेच वर ओढून घेअून, आपल्या विचाराच्या ओघाला प्रतिबंध न करता अूब येण्यासाठी ओढलेले पांघरूण नीटनेटकें करीत अंथरुणांतच ती किंचित् आंग घुसळीत पेगू लागली. त्या वेळच्या अनुकूल विचारामुळें सुधाकर आपल्याकडे प्रेमळ नजरेने रोखून पहात आहेत, गालातल्या गालात हंसून काहीं हलकेच विचारीत, ताजें आणलेले टवटवीत गुलाबाचे फुल आपल्याला देत असताना आपणही ते तितक्याच प्रेमानें, स्मितमुखाने घेत आहोंत आणि तितक्यातच लटक्या रागाच्या आविर्भावाने काहीं तरी त्याना टोमणा मारीत आहोत अशा विचारातच ती जागृतींतून सुषुप्तीत शिरून गुंगत होती तोंच तिकडे—

‘अग आअी, आअी, आअी ! अग बाअी, मेले, मेले ! शाते, धाव ग धाव ! या हो अिकडे या—मी मेलें—चालले !’ अशी झोपेतून आरडत किंचाळतच कमल अेकदम अुठली.



## प्रकरण चवथें

# विरहाचें सुख

सकाळी अुठल्यापासून शातेच्या आअीला, शाता आज परत यावयाची असल्यामुळे साहजिकच काहीं सुचेनासें झाले होते व ती अेकसारखी मधुकराला स्टेशनवर न विसरता जाण्याबद्दल बजावीत होती ! मातृहृदयाच्या ओढीने ती तसे सागत होती पण खरे सागावयाचे म्हटले तर त्याकडे मधुकराचे दुर्लक्षच होते; कारण त्याला कॉलेजातील काहीं निकडीचे काम असल्यामुळे सुधाकरानेच अेकट्याने स्टेशनवर जाअून शातेला अुतरून घ्यावी व घरी आणावी असा त्या दोघानी पूर्वीच बेत केला होता.

ठरल्या वेळी सुधाकर मधुकराकडे आला. दोघाचेही साकेतिक दृष्टिक्षेप होअून, करपल्लवीच्या अबोल भाषेत मूक संदेशविनिमय झाला. बिचाऱ्या शातेच्या आअीला त्याचें हे गूढ राजकारण काहीच कळले नाही. घरातून बाहेर निघता निघता मधुकराने सुधाकर अेकटाच स्टेशनवरून शातेला घेअून येणार असल्याचे आपल्या आअीला सागितले. त्यावर ती कांहीं बोलणार तोच ‘ त्यात काय झाले ! सुधाकर तरी आपलाच आहे ना !’ असे त्याने म्हटलें व दोघेही बाहेर पडून निरनिराळ्या दिशानी गेले.

आजपर्यंत कॉलेजच्या वातावरणांत फिरणारे सुधाकराचे मन आणि देह या दोघाची विचार आचार या बाबतीत फारकतच असे. शाळेच्या चिमण्या जगातून स्वैर सुटलेले मन प्रेम, समाज अथवा राजकारण असल्या कुठल्या तरी जाळ्यात अडकते. सुधाकराने प्रेमाला प्राधान्य देअून तो ‘मूर्ति–पूजक’ बनला आणि शातेच्याच ठिकाणी त्याने आपल्या प्रेमाची प्राणप्रतिष्ठा केली.

थोड्या दिवसाचा असो किंवा फार दिवसाचा असो, विरह हा विरहासारखाच भासतो—जाणवतो. शाता सुधाकराची विधिपूर्वक धर्मपत्नी झालेली नसली तरी प्रेमाच्या बंडखोर राज्यात परस्परानी मनाने अेकमेकाची निवड केली होती खास ! अल्प परिचयाचे रूपातर अितक्या थराला कसे, केव्हा गेले याची कोणालाही—त्याना स्वतःलाही—कल्पना नव्हती. ठराविक वेळी फिरण्याच्या निमित्ताने मधुकराच्या घरी येअून सुधाकराने कधीं अेकादे मासिक, केव्हा अेकादे रमणीय चित्र, तर कधी फुलाचा गजरा–गुच्छ याच्या द्वारे आपले प्रेमसदेश शातेपर्यंत पोहोचविले. शातेलाही तो आल्याची चाहूल बरोबर लागे आणि त्याच्या मूक स्वागताकरिता ती अुगाचच अिकडून तिकडे जाअी. सुधाकराला ती खूण पटून प्रेमाचे ब्रह्माड त्याच्या दृष्टीपुढे अुभे राही. असो.

स्टेशनवर जाता जाता हीच स्मरणी सुधाकर जपत चालला होता त्यामुळे तो स्टेशनवर केव्हा व कसा दाखल झाला याची कल्पनाही त्याला आली नाही. दूर अतरावर गाडी दिसूं लागताच त्याच्या अंतःकरणाची तीव्रता वाढली व हमालाची धावपळ, माल विकणाराचे कर्णकर्कश ओरडणें, व अितर अुतारूंचा कोलाहल याकडे त्याचे लक्ष वेधले नाही. प्रवासामुळे चेहरा किंचित् मलूल झालेला, केस विसकटलेले, बऱ्याच दिवसानी घरी परत येण्याने वाटणारे नवेपणाचे कुतूहल, अुतरून घेण्यासाठी अपेक्षेप्रमाणें 'माणसे' आली आहेत की नाहीत हे पाहाणारी शोधक दृष्टि, अशाच थाटातील शातेची अुत्कंठित मूर्ति पाहाण्यासाठी त्याची सारी शक्ती डोळ्यात अेकवटलेली होती.

गाडी थाबून तिच्यातील माणसे अुतरू लागली, बायकाच्या डब्यातून काहीं बायकाही अुतरल्या पण सुधाकर पहात होता ती मूर्ति मात्र कोठेच दिसेना. प्रथम अधीरतेने व नतर थोड्या आशायुक्त निराशेनेच त्याने

अेकदोन खेपा घातल्या. शाता आली नाहीं ही गोष्ट कळून सवरूनही त्यानें अुगाचच सर्व डबे निरखून पहाण्यासाठी पुन्हा अेक चक्कर मारली. तितक्यात त्याचे लक्ष जिन्याकडे गेले. हातात थोडे सामान घेअून व बाकीचें हमालाजवळ देअून लगबगीने चाललेल्या—हो, शाताच ती! आपली व तिची चुकामूक कशी झाली? याचे आश्चर्य करण्यात वेळ न घालविता—त्या दिशेने तो तडक धावत गेला, आणि तिच्याशी काही बोलणार तोच त्या स्त्रीने मागे वळून पाहिले. तिचा चेहेरा दृष्टीस पडताच क्षणैक चमकून गेलेल्या निराशेच्या चकाकीने सुधाकर अधिकच निस्तेज दिसूं लागला.

जड पावलानें आणि मनानें तो स्टेशनच्या बाहेर पडला. येताना केवढ्या अुल्हासाने आणि आशेने आपण आलो होतो आणि आता परत जाताना खिन्न होअून जाण्याची वेळ आली आहे हा विचारही त्याच्या मनात आल्याशिवाय राहिला नाही.

शाता का आली नाही या प्रश्नाचे अुत्तर शोधीतच तो परत आला पण काहीं केल्या ते त्याला मिळेना. घरीं आल्यावर त्याने किती वेळा तरी शातेच्या पत्राचे निरीक्षण केले. तारीख, वेळ, हस्ताक्षर या सर्वांवरून शाता यावयास पाहिजे होती. पण ती आली नाहीं त्यामुळे तो बेचैन राहिला. कॉलेजकडे, खेळण्याकडे किंवा वाचनाकडेही त्याचे लक्ष वेधेना. प्राप्त कर्तव्य म्हणूनच तो दररोजचे व्यवहार अुरकी अितकेच! स्टेशनवरून परत आल्यापासून आज सबंध दिवसभर त्याच्या डोक्यात विचारानीं नुसता धुमाकूळ घातला होता.

‘ शातेची आणि माझी गाठ हा खरोखरच दैवी योगायोगच नव्हे का! शातेपेक्षा किती तरी पटीने सुंदर अशा मुली माझ्या पाहाण्यात आल्या असतील पण तिच्याविषयींच आपल्या मनात प्रेमोद्भव व्हावा याला त्यावाचून दुसरे कोणतें अुत्तर मिळणार? परिचय, सहवास व आत्मिक

आकर्षण याच प्रेमाच्या—सात्विक प्रेमाच्याही—पायऱ्या होत. प्रथम दर्शनीं प्रेम, प्रथम दर्शनीं प्रेम म्हणून जो अेक सांप्रदाय रूढ आहे असे वाटते त्यात झाले तरी आत्मिक शक्तींचे तीव्र आकर्षण अितक्या लवकर होतें कीं, परिचय आणि सहवास यांची अपेक्षाच त्यामुळे अुरत नाहीं. खोट्या भुकेप्रमाणेच प्रेमाच्या आभासानेही मनुष्य कित्येक वेळा चकतो व त्याचे नुकसान होते, तसे तर माझ्या बाबतींत झाले नाही ना ? प्रत्येकालाच खरा स्नेही मिळणे जितके अशक्य तितकेच नाटक, कादबऱ्यातून पुरस्कार केलेले प्रेम प्रत्येकाने करणे, हेही अशक्यच !'

'पण सहवास आणि तज्जन्य जिव्हाळा याचे पर्यवसान प्रेमात होणे शक्य आहे ना ? तर मग शातेच्याही मनात तिच्या नव्या सहवासाबद्दल जिव्हाळा आणि प्रेम अुत्पन्न झालेच असेल ! आपल्या गैरहजेरीचाच हा परिणाम झाला खास ! नाहीं तर शाता अेरव्ही यावयाची ती का आली नाहीं ? बर, स्वतः बोटभर चिठ्ठी नाहीं, खुलासा नाही ! ना देवा, ना लेवा ! ती आपल्याला विसरली असेल का ? हाच का पाश्चात्य शिक्षणाचा तिच्या मनावर झालेला परिणाम ! अेकूण तिच्या पूर्व सस्कृतीपेक्षा परिस्थितीनेच शातेच्या मनावर, तिच्या सदसद्विवेक बुद्धीवर आणि तिच्या नितिमत्तेवर जास्त पगडा बसविला तर !'

हृदयातील कालवाकालव परमावधीला पोहोचल्यामुळे सकाळीं अुठल्याबरोबर त्याने खोलींतून बाहेर पडण्याचे ठरविले व तसा तो बाहेर पडलाही. त्याला नकळतच तो मधुकराचे घरी आला, तोच मधुकराने शातेचे पत्र त्याच्या हातात दिले.

पत्र आले तेव्हा शाता आजही आली नाहीं हे सहजच ठरले. शातेच्या आगमनाची अुत्सकता जितकी, ज्या प्रकारची व ज्या अर्थाची सुधाकराला होती तितकी व त्या अर्थाची मधुकराला किंवा त्याच्या आअीला असणें

शक्य नसल्याने सुधाकराला जसे वाअीट वाटत होते तसे त्या मायलेंकराना वाअीट न वाटता अुलट शातेचा थोडा लाडका रागच आला होता. पत्र मायलेंकरानी जेव्हा वाचले आणि ती आणखी काही दिवस तरी येणे शक्य नाहीं असें जेव्हा कळले तेव्हा 'काय करावं शातीला ! अितका लोकधार्जिणा स्वभाव चागला का ? गेली, राहिली, पुष्कळ झालं ! आम्ही म्हणतो, तिच्या कमलला बरं वाटत नाही म्हणूनच ती राहिली असेल, कबूल आहे आपल्याला ! पण कमलला काय जगात हीच अेकटी आहे? तिची आअी, तिची बहीण, नणद, सासू कुणीच का आल नसेल ? जो तो मअु सापडल कीं आपला कोपराने खणायला पाहातो! त्यातून आमच्या शातीचा भिडस्त स्वभाव ! होय म्हणायची नाही,नाही म्हणायची नाही ! आपल्या आअीला काय वाटतं, तिचा जीव कसा टागल्यासारखा होत असेल याच काही तिला आहे का ' अशा प्रकारची बोलणीं त्याच्यात पुन्हा पुन्हा कितीदा तरी झाली. सुधाकर येअून त्याने पत्र वाचल्यावर पुन्हा त्याचीच सुधारून वाढविलेली आवृत्ति तिघानी मिळून काढली. मधुकराचे मत पडले की शातेला आता तिकडे मुळीच न ठेवता तार करून बोलवावी, झाला अुपकार पुरे झाला ! सुधाकराचे मत द्विधा झाले. त्याला शाता यावी असे वाटे. ती करते आहे तेच बरोबर आहे, तिचे करणे सहेतुक असले पाहिजे ! वियोगाचा ताण तुटतो आहे की तगतो आहे हेही तिला पाहावयाचे असेल ! आपण अुतावीळपणाने तिच्या मर्जीविरुद्ध वागलो तर आपलीच परीक्षा होअील ! तेव्हा जे पत्र आता तिला लिहावयाचे ते तिने येण्याबद्दल तर लिहावेच पण तिने येण्यापूर्वी कमलजवळ तिचे कोणीतरी मायेचें अगर नात्याचे माणूस तेथे आणवावे व नंतर तेथून परत यावे असा सल्ला त्या मायलेकराना द्यावा असे त्याला वाटून त्याने तसेंच आपल्या मित्रास सांगितले.

भवांत न भवति होऊन अखेर आओीच्या विचारे शातेला सुधाकराने दिलेल्या सल्ल्याप्रमाणेंच पत्र पाठवावयाचे ठरले. ते पत्र पाठविण्याची कामगिरी मधुकराने हंसत हंसत सुधाकरावरच लादली व त्याने ती पारा पाडण्याची बिनशर्त कबूलही केली.

सुधाकराने मोठ्या आशेने, अुत्सुकतेने आणि जिव्हाळ्याने शातेने स्वीकारलेल्या कार्याचा गौरव करून मोठ्या युक्तीने, अिकडे निघून येण्याविषयीची तिच्या आओीची अिच्छा, मधुकराची मनीषा आणि आपली असीम आतुरता सुंदर अक्षरात लिहून कळविली. व पत्र त्याच दिवशीं टपालात टाकले. ते अेकच् पत्र काय पण त्या पत्रानतर दर चार आठ दिवशी सुधाकर त्या अेकाच अर्थाची पण निरनिराळ्या भाषेत, निरनिराळ्या रसात, निरनिराळ्या भावनेतील पत्रे शातेला लिहीत सुटला होता.

पण तिकडे सुधाकराच्या त्या सर्व पत्राचा काय शेवट होत होता !



## प्रकरण पांचवें

# दुखणें उलटले !

कमल झोपेतून अेकदम ओरडत अुठल्यामुळे शातेची गुंगी पार कोठच्या कोठे नाहीशी झाली व ती अेकदम धडपडूनच अुठली. तिला घाबरल्यासारखे झाले होते. झोपेची झापड डोळ्यावर आणि विचाराचा अमल मनावर अजूनही जाणवीत असून तिची स्वप्नसृष्टी पूर्णपणे नष्ट झालेली नव्हती. घाबरटपणाने ‌इकडे तिकडे पहात पहात, ‘ अगबाअी, काय ? कोण ? कुठे ?’ असें काहीं आपल्याशींच बोलत ती अुठून अुभी राहिली.

कमल ओरडत, विव्हळत शातेला व कान्ताला जवळ येण्यासाठीं अेकसारख्या हाका मारीत होती.

लगतच्याच खोलींत दारे अुघडीं ठेअून कात आपल्या पलंगावर तसाच झोपीं गेलेला होता. वाचता वाचता अर्धवट राहिलेले ‘नवाकाळ’ वर्तमानपत्र तसेच त्याच्या छातीवर आणि चेहऱ्यावर पडले होते. अुशाच्या बाजूलाच अेका लहानशा तिपाअीवर **प्रभाकर** आपली प्रभा अुधळीत तसाच राहिला होता. झोपेच्या सर्वस्वीं आधीन झाल्यामुळे कातात्ला दिवा कमी करण्याचे सुचले नाही. त्याची ती पहिली झोंप होती आणि आज तर तो कचेरींत विशेषच दमला–भागला होता. शिवाय अुण्याला भर म्हणूनच की काय कोण जाणे, संध्याकाळी शातेने केलेले गोडधोड पदार्थ जरा आग्रहामुळे त्याच्या पोटात जास्तच गेल्यामुळे त्या ताज्या व जड अन्नाचा अंमलही त्याच्यावर चागलाच चढला होता. अशा झोंपेंत असूनही कान्ताच्या गाढ निद्रेचा भंग कमलच्या ओरडण्याने केला. तोही

तसाच गडबडून धडपडत अुठला व ‘ काय ! कोण ! काय झाले ! ह, आलोच हा मी ! घाबरूं नका ’ म्हणत तो पलंगावरून ताडकन् अुडी मारून खोलीतून बाहेर पडला.

रात्रीची वेळ, बाहेर काळोख मी म्हणत होता! तशात पाअूस पण रात्रभर झिम्‌झिम् झिम्‌झिम् झडत होताच ! बाहेर नुसते डोकावून पहाण्यास देखील मन घेत नव्हते. मग अशा स्थितीत बाहेर पाअूल टाकण्याची तर गोष्टच बोलावयास नको !

शाता व कान्त दोघेही कमलजवळ गेले. तिच्या आगात आता ताप चागलाच फणफणला होता. डोळे लालबुंद गुंजेसारखे दिसूं लागून आवाज खोल खोल येत होता. ती पहिल्या प्रथम जी काय अेकदा किचाळली तेवढीच. मग तिला ओरडणेही कठिण झाले. विलक्षण अशक्तपणा येअून तिचे हातपायच गळल्यासारखे तिला वाटूं लागले व त्यामुळे तिचा धीरही सुटला. कमळेचे दुखणे अुलटले हे शातेच्या ध्यानात आले व कान्तही ते कळून चुकला.

त्या वेळी त्या दोघाकडे कमलने अशा काही करुण दृष्टीने पाहिले कीं, तेवढ्यानेच दोघाच्याही काळजाचे पाणी पाणीच झाले. शातेच्या डोळ्यांतून गंगायमुना वाहू लागल्या पण कान्त पुरुषासारखा पुरुष असूनही हुदका आवरण्यास असमर्थ ठरला.

“ काय झालं ! अितकी घाबरलीस का ! भ्यालीस होय ! डॉक्टरकडे बोलावणं जाअूं दे का ! तुला काय होतंय ! ” शातेने तिला धीर येण्या-साठी पाठीवरून प्रेमाने हात फिरवीत विचारलें. त्याच हेतूनें तिने अेकदा कान्ताकडे पाहिले.

कात लगेच आपला शर्ट, कोट पाहूं लागला. पण तितक्यात त्याला डॉक्टर रामराव आदल्या रात्रीच दुसऱ्या गावी काहीं खाजगी कामासाठीं

निघून गेल्याचे आठवले. आता अशा रात्री अपरात्री दुसऱ्या कोणत्या डॉक्टरकडे जावे ! कोण भेटणार ! आणि भेटल्यास अशा पावसातून व अंधारातून चिखल तुडवीत सुखशय्या सोडून कोण यावयाला तयार होणार ! आपण गेलो तरी कोणीही अगोदर अुठणारच नाही. त्यातून अुठला तरी शेकडो सबबी आणि हजार पंचायती लावील, अुद्या येअू म्हणून सागेल. आणि फार झाले तर कसली तरी पुडी देअून तात्पुरते ' आता यावर भागेल, शात झोप येअील मग सकाळीं या म्हणजे पुन्हा पाहूं ' असे सागून आपल्यालाच तो परतवणीचा आहेर करील असेच आतापर्यंतच्या त्याच्या स्वानुभवावरून कांताला वाटले. डॉक्टर रामरावानीसुद्धा हा अनुभव कांताला अनेक वेळेला अुपभोगण्यास दिला होता. आणि पुष्कळ वेळी बरेचसे डॉक्टर असेच करतात. कांतासारखी नवखी, घाबरट, तरुण,ताज्या रक्ताची माणसे अेवढ्या तेवढ्यावरून राअीचा पर्वत करून अुठल्या सुटल्या त्याच्याकडे धावतात त्यामुळे त्यानाही अशाना तसेच परत पिटाळावे लागते.

आज पुष्कळ दिवसापासून कमलच्या आजाराची हकीगत बऱ्याच लोकाना माहीत होती; तेव्हा या वेळी कांत कुठल्याही डॉक्टरच्या दाराशी जाअून त्याला अुठविण्याचा प्रयत्न करता तर त्याला त्याच्या कल्पनेप्रमाणे अनुभव आला नसताच असे हटकून म्हणता यावयाचे नाहीं. तसेच विचार त्याच्या मनात आले आणि त्याचे हातपाय जास्तच गळले. तगातच त्याची हालचाल निरखून कमलने कांताला हाताने खूण करून जवळ बोलावून अगदीं खोल आवाजात म्हटले, " डॉक्टर आणण्याची काही जरूरी नाहीं नी आपण अुगाच जाअूही नये येथून ! "

कमलची अेकदर मुद्रा फिरलेली होती, ती भेसूर दिसू लागून तिचा स्वतःचा धीर खचला होता. मनानेही ती निराशच झाली होती. याअुपर मात्र आपण यातून वाचत नाही असे तिच्या मनाने त्या वेळीं पक्के

घेतल्याचे दिसले. तिने शातेच्या खाद्यावर आपली मान टाकून कण्हत कण्हत तेच सागितले. अितक्या खंबीर मनाची शाता पण ती सुद्धा अशा वेळीं गडबडली व तिलाही कमलची समजूत काढणे अशक्यप्राय झालें होते ! काताच्या तोंडातून तर त्या वेळी शब्दच निघेना. तो हताश मुद्रेने कमलकडे तटस्थपणाने पहात जवळच अेकाद्या दगडी पुतळ्याप्रमाणे जागच्या जागी खिळून अुभा राहीला. त्याच्या डोळ्यातून अेकसारखे अश्रु-प्रवाह चालले होते.

कमलने त्याला रडू नका असेही सागितले नाही किवा त्याला धीर येअील अशीही ती काही बोलली नाही. कारण तसे करावयाला ती स्वत: कुठे तशी धीर धरून होती ! तिचा स्वत:चाच धीर सुटला होता व जणू काय अिहलोकातले सर्व अृणानुबंध तटातट तुटत असून परलोकींचे बोला-वणे तातडीने आले आहे असे तिला वाटत असावे असेच तिच्या त्या वेळच्या अेकदर वागण्यावरून आणि हालचालीवरून कोणाच्याही सहज लक्षात आले असते.

या वेळच्या कमल, शाता आणि कात याच्या परिस्थितीची व प्रसंगाची कल्पना, ज्याना तसली परिस्थिति किंवा प्रसंग अनुभवावयास वा भोगावयास मिळाले असतील त्याच्याखेरीज अितर कोणासही कल्पनेच्या करामतीनेही करणे कठीण आहे. अशा वेळी प्रत्येक क्षण दीर्घ युगासारखा वाटतो, रात्र भयाण, भेसूर भासते आणि ती कधीकाळीं सपून त्यानतर अुजाडावयाचेच नाहीं अशीच मनाची खातरजमा होअून सभोवतालची सगळी सत्यसृष्टी स्वप्नसृष्टींत समावून सगळीकडे भयानक दिसूं लागतें. दिवे नेहमींप्रमाणेच प्रकाशत असूनही त्याची प्रभाच नष्ट झाल्यासारखी दिसते व त्यामुळे अंधार भरून राहिलेले जागेचे कोपरे जसे काहीं खायला चालून येत आहेत असें वाटते. समोरच्या आजाऱ्याबद्दल अेका क्षणीं आपुलकी तर दुसऱ्याच क्षणीं



शांतेच्या खांद्यावर आपली मान टाकून 'या पुढे मात्र आपण वाचत नाही' असे कमलने कण्हत कण्हतच तिला सांगितले.

तितकाच कठोरपणा मनात येत असतो. हे असलें भयंकर दृश्य, व ह्या यमयातना याचा अेकदमच लय होअील तर बरे; जे काय यदृच्छेनें बरें-वाअीट होणे असेल तें अेकदम व अेकदाच तडकाफडकी झाले तर अुत्तम; आजाऱ्याच्या यमयातना आता या पुढें लाबावयाला नकोत आणि आपल्या-लाही त्या प्रत्यक्ष पाहून मानसिक क्लेश सोसणे नको असे वाटत असते !

हुबेहुब हीच अवस्था काताची त्यावेळी झालेली होती. 'मन चिंती ते वैरीही न चिंती' म्हणतात त्याचा पुरेपुर अनुभव कात प्रत्यक्षात अनुभ-वीत होता, तर शातेची मनःस्थिति याहीपेक्षा विलक्षणच झाली होती.

शरद् अृतूंत आगाअू कल्पना नसताही स्वच्छ नभोमडळात कृष्णमेघ अवेळीं जमून त्यातून विजेचा भयंकर कडकडाट अेकदम झाला म्हणजे जशा कानठळ्या बसतात आणि मेदू व शरीर बधीर होअून, त्या कडकडाटापूर्वी आपले विचार काय होते—आपण आनदीत होतो का दुःखीत होतो याचें जसं माणसाला ज्ञानच अुरत नाहीं तशीच अवस्था शातेची या प्रसंगी झाली होती. झोपेपूर्वी आपण कोणत्या विचारात गर्क होतो, तीतूनच कमलच्या करुण किंकाळीनें जाग कशी आली, समोरच कमलची काय अवस्था पहात आहोत; आपले विचारचक्र कोठपर्यंत आले होते, पुढे आपल्याला कोणता विचार केला पाहिजे या सर्वांबद्दल शान्ता मनाने, विचाराने आणि विका-राने सुन्नच झाली होती. कमळ आजारी असल्याचे आपणास कळले म्हणून आपण त्वरीत धावत आलो काय ? आपल्या दक्ष व प्रेमळ परिचर्ये-मुळे तिला थोडे बरे वाटूं लागले काय ? आणि शेवटीं हें असे अेका-अेकीं तिचें दुखणे अुलटून मूळ पदावर आलें ते काय—नव्हे मुळापेक्षाही दुखण्याची पायरी पुढे गेली ती काय ? तिला काहींच समजेना किंवा पुढे आपण कसें वागावे हेही अुमजेना !

कमल मधून मधून काही तरी असबद्ध बरळतच होती.

शान्ता शून्य मनाने अेकाद्या निर्विकार बाहुलीप्रमाणे कमलच्या अंथरुणावर तिच्या लगतच बसली होती.

आधून मधूनच ती कोठे कमलच्या अंगावरून हात फिरीव, नाही तर डोकीवर हात दाबून धर किवा तिच्या अंगावरचे पाघरुण नीटनेटके कर, असे काही तरी चाळे करताना, अबोल चलच्चित्रपटातील अेकाद्या भूमिकेप्रमाणे भासे.

कान्त मात्र हतबुद्धच झाला होता ! आशा–निराशेचे तुबळ युद्ध त्याच्या मस्तकात जुपून आपले विधिलिखित काय आहे याचाच तो विचार करीत होता. त्या दोघीच्या हालचालीकडे तो अेकाद्या चित्रातल्या देखाव्याप्रमाणे तटस्थपणे पहात राहिला होता. भवितव्यता भीषण रूपात त्याच्या दृष्टीपुढे थयथय नाचत होती. भलत्या सलत्या कल्पनानीच त्याला सतत भडाविल्यामुळे त्याच्या दोन्ही डोळ्यातून अविरत अश्रुप्रवाह चालू होता.

ते पहात असता कमलचे आधीच व्याकूळलेले मन अधिकाधिकच कोळपून, जळून निघत होते. कान्ताना रडू नका म्हणूनही तिला म्हणता येअीना की, त्याचे रडूही तिला साहवेना.

काहीं वेळाने कमलच्या तोडाला कोरड पडल्याने तिने शातेकडे पहात पहात क्षीण आवाजातच "पाणी—पाणी दे ग शाता ! कोरड पडली आहे घशाला" असें म्हटलें.

शाता तिच्यासाठीं पाणी तापवून आणण्याकरिता व त्याबरोबरच थोडें काहीं खायला करून आणण्यासाठीं म्हणून तेथून अुठून आत गेली. अशा अपरात्रीं रोग्याला ती नुसतीच पाणी कसे देणार ! म्हणूनच काही तरी खायला देअून मग पाणी देअू, असे ती काताला हलकेच म्हणाली, व आपण परत येअीपर्यत काताने तिच्याजवळून हलू नये असे नुसते त्याच्याकडलि पहाण्यानेच त्याला तिने सुचाविलें. नंतर ती आत गेली.

आतापर्यंत कांताने आतल्याआत दाबून धरून आवरलेला हुंदका त्याच्या प्रयत्नाना न जुमानता स्वैर गतीनें अेकदम बाहेर आला. कमल तर ते पाहून जास्तच व्याकूळ झाली.

"असं काय ते करायचं ? अैकले का !"

"काय म्हणतेस ?"

"हे असं रडायचं नाही गडे ! आपण आता—"

"काय करूं ? तुझी अवस्था मला तर ठीक दिसत नाहीं. दुर्दैवाच्या मनात काय आहे ते काहीं मला कळत नाही. कमल—"

"बर का ! अस रडू नये गडे. माझं काय वाअीट होणार आहे ? सौभाग्याचा मळवट भरून दोही हाती हळदकुकू अुधळीत आपल्या माडी-वर जर अस मला भाग्याच मरण आलं तर–"

"नको, नको, कमल, अस बोलू नकोस ! तू भाग्यशाली होशील पण मला हतभाग्याला अवघा जन्म दुःखाच्या वाळवटात हायहाय करीत निष्प्रेम भटकावं लागेल ! पण छेः, तुझ्यानंतर अेक क्षणही मी जगूं शकणार नाही. तुझ्याबरोबरच माझाही आत्मा हा लोक सोडून जाअिल !"

पुढे दोघानाही रडे आवरेना. कान्ताने स्वतःची रेखाटलेली मनःस्थिति तिला अगोदरच पटलेली होती व आपल्या स्वतःच्या मृत्यूपेक्षा आणि आपल्या अपुऱ्या राहिलेल्या प्रेमी संसारापेक्षा कांताबद्दल आणि त्याच्या भावि निष्प्रेमी जिविताबद्दलच तिला आत्यंतिक दुःख वाटत होतें. मृत्यूच्या वेदनापेक्षाही आपल्या पतीचे आपल्या पश्चात् कसें होअील याच दारुण चिंतेच्या वेदना तिला जास्त तापदायक होत होत्या. त्यात आपल्या प्रेमाभावीं कांत क्षणभरही जीव ठेवावयाला तयार नाहीं, अेकादे वेळीं त्रागा करून जीवाचे काहीं बरें वाअीटही करील अशी जबर दहशत तिला वाटत होती. कांताचे बोलणें झाल्यानंतर कमलला रडूं कोसळले हे खरें; पण

त्याबरोबरच आपल्या मृत्युनंतर कांताचे सरक्षण कसे होईल, कोणत्या अुपायाने आपल्या पाठीमागे कांताला सुख लागेल याही विचारानी तिला भंडावून सोडले होते.

पण देवाची खैर म्हणा किंवा दैवाचा बलवत्तरपणा म्हणा, अशाच विलक्षण अडचणीत मन सापडल्यामुळे तिला निर्वाणीचा अेक अुपाय सुचला ! व त्यासरशी तिला अेकदम हायसे झाले ! तशाच अवस्थेत तिला बरे वाटले. मागचा पुढचा काही अेक विचार न करता तिने आपल्या मनाचा अेक प्रकारे निश्चय केला व त्याच क्षणीं कांताला खुणेनें जास्तच जवळ बोलावून म्हटले, "माझी अेक गोष्ट अैकण होअील का ?"

"काय सांगणार आहेस ?"

"अैकेन म्हणून मला आधी वचन द्यावे मग मी—"

"वचन ? वचन कशाला ? कमल, अशा घटकेला तू काही सांगितलंस तर अैकणार नाहीं अितका का मी तुझ्या दृष्टीने अगदी—"

"ते राहूं दे. पण आधीं वचन द्यावच !"

"बर ! हे घे वचन ! बोल आता ! काय सांगणार आहेस ?"

"नुसत मोघम वचन नको मला !"

"मग ?"

"माझ्या गळ्यावर हात ठेवून माझी शपथ घ्यावी नी—"

"म्हणजे ?"

"होय ! माझ्या गळ्याची शपथ घ्यावी की मी जे काय सांगेन ते अैकणं होअील म्हणून !"

कान्त कांहींच बोलेना. त्याला मोठेच चमत्कारीक झाले. कमल आपल्याला सांगणार आहे तरी काय याबद्दल त्याच्या मस्तकात शंकाकुशंकांची अलोट दाटी झाली. तो तिच्याकडे रोखल्या नजरेने पहात होता पण कम-

ळचा जीव त्यामुळेच आशानिराशेच्या झोल्यावर हेलकावत होता. आपल्या सहचारिणीला त्रास होअूं नये म्हणून काताचा जीव खाली वर होत होता तर त्याला सुखी ठेवण्यासाठीं ती धडपडत होती.

" कमल—"

" नाही ना शपथ घ्यायची ! माझी शेवटची अिच्छा नाही ना पुरवायची ! मला आधी वचन देअून आता फसवायचा का विचार आहे ! माझं अैकलं नाही तर माझा प्राणसुद्धा सुखानं जाणार नाही. स्वर्गी जाअून तिथं मला सुखाचा लवलेशही लाभणार नाही. अैकायचं ना गडे माझं ! वहायची ना माझ्या गळ्याची शपथ !"

तिला बोलवत नसल्यामुळे प्रत्येक शब्द अुच्चारताना तिला दमल्यासारखे होअून थोडा वेळ थाबावे लागे. मध्येच कात तिला बोलती बद करी तर मध्येच ती कोरड पडलेल्या ओठाला ओलावा यावा म्हणून कोरडी पडलेली जीभच अेकेक शब्द अुचारून झाल्यावर पुन्हा पुन्हा ओठावरून फिरवी.

" कमल, बोलूं नकोस ग. तुला अितकं बोलवत नाही तर का त्रास घेतेस ! थाब, पाणी आणू दे ! तहान ना लागली आहे तुला ! शाता अजून का पाणी आणीत नाही—थाब, मीच जाअून पाणी आणतो हं" असे म्हणून कात अुठू लागे तर कमल त्याला आपल्या निर्बल हातानीं नको म्हणून थाबवी व त्याला जाअूं देत नसे. आपले बोलणे अैकविण्याकरिता जागच्या जागीच त्याला तसेच बसवी मग मात्र त्याचा नाअिलाज होअी. कमल सागेल ते अैकलेच पाहिजे त्याशिवाय आपली सुटका होणे अशक्य आहे व तिच्या जिवाला अधिक कष्ट देण्यात अर्थही नाही असें काताला अखेर नक्की कळून चुकले आणि नंतर त्याने कमळला आणखी बोलूंच दिलें नाहीं.

कमलच्या गळ्यावर आपला अेक हात अगदी अलगत ठेवून तिच्याकडे अश्रुपूर्ण, प्रेमळ पण गंभीर दृष्टि लावून अत्यंत मृदु आवाजात त्यानें म्हटले, "कमल, तुझ्याच गळ्याची शपथ! तूं सागशील ते मी निमूट अैकेन! सांग आता काय ते!"

"आनंदानं?"

"हो, अगदी आनदाने!"

कमलला गगनाधिक आनंद झाला. कांताकडे अेकाग्र दृष्टि लावून, जणूं काय त्याने बोलून दाखविलेले अंतःकरणापासून कीं ओठापासून होते याचा ती प्रत्यक्ष पडताळाच पहात होती. पण तिला त्यात लवमात्र शका अुरली नाहीं. काताने मनापासूनच शपथ वाहिली ही तिची खात्री झाली. मग तिने मनाची सावरासावर केली; आवंढा गिळला; आपला अशक्त हात त्याच्या मांडीवर ठेवला, दुसरा हात—वर अुचलला जात नव्हता तरी तसाच नेटाने अुचलून—आपल्या तोंडाजवळ तोंड आणलेल्या काताच्या डोक्यावरील केसावरून फिरविला आणि अगदी हलक्या पण लाडक्या व कापऱ्या आवाजात काताला म्हटले, "किनअी, मी मेल्यावर मला स्वर्गात दुःख होअूं नये अशी आपली अिच्छा आहे ना?"

"हे काय विचारतेस! तूं मरूंच नयेस अशी माझी अिच्छा आहे."

कमल ते अैकून शुष्क हंसली.

"माझ्या पश्चात् आपली अवस्था काय होअील?" तिने विचारले.

'मी मरेनच' असे कांत म्हणणार होता पण त्याला तें म्हणवेना. त्यामुळें कमळला अधिकच त्रास पोहोचेल ही त्याची खात्री होती म्हणूनच तो या वेळीं विवेकं करून स्वस्थ बसला.

"बरं का! स्वर्गात मला दुःख होअूं नये व माझ्यामागें आपण दुःखी असूं नये यासाठीं मी अिकडे अेक गोष्ट करायला सांगणार आहे—"

" कोणती ती !"

" अैकायची होअील ना पण !"

" कमळ, मीं वचन दिल आहे नी तुझ्या गळ्याची शपथही वाहिली आहे ना ! "

" मी आणि शांता कशा जिवाभावाच्या मैत्रिणी आहोंत; शरीरंच काय ती निराळी; बाकी दोघींची मनं अेकच, असंच नेहमीं अिकडून म्हणणं होअी ना ! "

" हो. "

" तिचं अजून लगीन व्हायचं आहे ! "

" बरं मग ! मला काय त्याचं !"

" माझ्या पश्चात् आपण शातेशीं विवाह करावा. तीच माझ्यामागें माझ्या अितकीच आपल्याला सुखी करील. माझी आठवण अिकडे ती मुळींच होअू देणार नाही !"

काताला विजेचा जबर धक्का बसल्यासारखे झाले ! तो ताडकन् जागेवरून अुठून कमलपासून अेकदम दूर झाला.

त्याच्या त्या तशा अुठण्यानें आजारी कमल किती दचकली !

' हें कालत्रयी होणार नाहीं ' असे शब्द त्याच्या अगदीं ओंठावर आले होते पण आपण वचन देअून कमलच्या गळ्याची शपथ वाहिली आहे हे आठवून त्याने कमलकडे मान वर करून पाहिलें.

तीही त्याला त्याचीच आठवण देत आहे असे त्याला वाटले.

---

## प्रकरण सहावें

# मृत्युच्या मांडीवर

कांहीं वेळाने कान्त कमलच्याजवळ पुन्हा येअून बसला. त्याच्या डोळ्याचे पाणी अजून खळले नव्हतेच. कल्पना राक्षसी त्याला भडावूं लागली होती. काय, आपली कमल मरणार आणि आपण तिच्या मागे जिवत राहून तिला विसरून जाअून तिच्या जिवलग मैत्रिणीबरोबर—शातेबरोबर—विवाहीत होअून ससाराच्या सारीपटावरील अुधळलेला डाव पुन्हा सावरू पहाणार ? शक्य तरी आहे का हे ? ज्या वेळी कमलची प्राणज्योत विझेल त्याच क्षणी आपलेही पंचप्राण यमराज हिरावून घेअील तर किती अुत्तम होअील ? कुजलेल्या डावावर अपेक्षीत दान घेअून काय अुपयोग होणार असे सुद्धा काताच्या मनात आल्याशिवाय राहिले नाही. तो व्याकूळ झाला, पण त्याला आपली व्याकुलता आपल्याहून अधिकच व्याकूळ झालेल्या कमलेच्या दृष्टीस पाडणे अशक्य होते. मृत्यूच्या माडीवर असणाऱ्यास आपली व्याकुलता दाखविणे म्हणजे त्याचा अत अधिकच जवळ आणण्यासारखे होय हे कान्त पूर्णपणें जाणत होता.

कमलची अखेरची अिच्छा, आपण होय म्हणूनच पुरविली पाहिजे, त्याखेरीज आपणास गत्यतर नाहीं असे काताला मन घट्ट करून त्या अल्पावकाशात तडकाफडकी ठरवावे लागले—नव्हे त्याला ते भागच पडले.

क्षीण दृष्टीने काताकडे पहात अगदी खोल आवाजात कमल पुन्हा तो प्रश्न विचारणार तोच काताने मनाचा दृढ निश्चय करून आपल्या प्राणाहून प्रिय असलेल्या पत्नीची अंतिम अिच्छा आपण अंमलात आणूं असे सागण्याचें ठरविलें.

"हे पहा !" कांताच्या मांडीवर आपला हात ठेअून कमलने विचारीले.

" काय ? " कान्ताने तिच्या पाठीवर हात ठेवीत म्हटले.

" माझ्या मनासारखे होय नाही का म्हणावयाचे ? मी स्वर्गात सुखी होअू नये अशी का आपली इच्छा आहे ? "

" कमल—" कांत आता बोलण्यास सज्ज झाला होता पण पुन्हा तो अडखळला. त्याची जीभ लुली पडल्याप्रमाणे झाली. आपण हो म्हटल्याशिवाय आपली अर्धांगी सुखी होणार नाही हे त्याला कळून चुकले. आज ते टाळले तरी तिच्यामागे तिच्या अतृप्त वासनेच्या प्रीत्यर्थ और्ध्वदेहिक संस्काराचे वेळी ते टळणे अशक्य, मग त्यापेक्षा आता कमलसमक्षच तसे कबूल का करूं नये ? आपल्या जीवाला यातना होतील पण त्या जात्या जीवाला तरी समाधान होअील की नाही ? मग अशा वेळी आपणच यमयातना सोसून त्या जीवाला समाधान नको का द्यायला ? दिलेच्च पाहिजे. यावेळी हेच त्वर्य कर्तव्य होय असे कांताने मनाला निक्षून बजावले आणि कमलला पुन्हा विचारण्याची पाळीच येअू द्यावयाची नाही असे ठरवून तो कमलकडे वळला. तिच्या केसावरून हलकेच हात फिरवीत तिच्या तोंडाजवळ तोंड आणले. त्याच्या कंठात हुंदका दाटून ओठ थरथरत होते, कपाळावर घाम आला होता, हृदय भरून आले होते पण तशातही मन कठोर करून तो म्हणाला, " कमल—"

तिने नुसतेच आशाळभूतपणाने त्याच्याकडे पाहिले.

" कमल, मी तुझ्या अिच्छेप्रमाणेच वागेन " कांताने सांगितले.

कमलला अेकदम हायसे झाले ! तिच्या त्या मृतकळा पसरलेल्या क्षीण चेहऱ्यावरही अेक बहारदार आनंदाची व सुखाची छटा चमकली ! कमलला बरे वाटले.

पण त्याचमुळे कांताची काय अवस्था झाली त्याचा तोच जाणे.

काताच्या निस्सीम प्रेमाची साक्ष कमलला पटली. त्याला आणखी बोलण्याची आवश्यकता नव्हती.

ती बोलली नाहीं. त्यानेही मूकवृत्ति धारण केली. त्याची हृदयेच हृदयाशी बोलत होती.

खालीं गेलेली शान्ता अेका हातात पाणी व लापशी व दुसऱ्या हातात कंदील घेअून आली. तिची चाहूल लागताच कान्त जरा बाजूस सरून बसला. तिच्या चेहऱ्याकडे पहाण्याचे धाष्टर्य त्याला झाले नाहीं. ती तेथे येताच अेकाद्या कळसूत्री बाहुल्याच्या यान्त्रिक गतीप्रमाणे तो पटकन् अुठून खोलीच्या बाहेर पडला. शान्तेचे त्याच्या हालचालीकडे लक्ष गेले नाहीं म्हणूनच बरे झाले. सारे अवधान रोग्याकडे असल्यामुळे, कान्त तेथून दूर झाला तो आपल्याला अैसपैस जागा मिळावी, आजाऱ्याजवळ बसून व्यवस्थितपणे खायला प्यायला देता यावे म्हणूनच, अशी तिची समजूत झाल्यास त्यात नवल नाही. त्यामुळेच तिने काताला त्या वेळी काही विचारले नाहीं व कातही काही बोलला नाही.

शाता कमलजवळ आली व हातातील दिव्याचा तिच्या डोळ्याला त्रास पोहोचू नये म्हणून तो जरा दूर सारून कमी केला आणि आपल्या हातातील जिनसा बाजूची अेक तिवअी जवळ ओढून त्यावर तिने ठेवल्या. कमलकडे अेकदा तिने निरखून पाहिले. ग्लानी येअून कमल डोळे मिटून स्वस्थ पडली असेलशी तिची कल्पना असल्यामुळे हलकेच तिच्या अंगावर अेक हात ठेवून व कानाजवळ तोड नेअून हळू आवाजात तिने, " कमल, पाणी हवं ना तुला ! अगोदर हें थोडं खाअून पाणी पी हं, हे बघ पाणी " असे म्हटलें. कमलनें डोळे मिटलेलेच होते. तशा स्थितींत स्वतःचा आजार विसरून ती कोणत्या विचारात गुंगली होती कोण जाणे ! पण शातेचा मायेचा हात शरीराला लागतांच व तिचा ममतेचा शब्द

कानात घुसताच कमलने डोळे अुघडून वर पाहिलें. काताच्या ठिकाणीं तिला शान्ताच दिसली.

दूरच्या दिव्याचा अंधुक प्रकाश तिच्या तोंडावर येतच होता. त्या प्रकाशातच तिनें डोळे अुघडलेले शांतेनें पाहिले तेव्हा थोड्या वेळापूर्वीचा तिच्या चेहऱ्यावरील व डोळ्यातील निस्तेजपणा आता तेथे दिसला नाहीं. चेहऱ्यावर सूक्ष्म अशी आनदलहरी व डोळ्यात कसली तरी कल्पना-तृप्तीच्या सुखाची लकेर शातेला दृग्गोचर होत होती.

शाता चमकली. कमलला वाताचा झटका तर आला नाही ना ! आणि असे असूनही कात तिच्यापासून दूर झाले कसे ! असेही विचार तिच्या मनात भुर्रदिशी येअून गेले. तिने अिकडे तिकडे अेकदा पाहून पुन्हा कमलला न्याहाळले.

" शाते---" कमल म्हणाली.

" काय कमल ! "

" आणलंस पाणी–दे बर ! " असा चागल्या सावध माणसाच्या आवाजासारखा तिचा आवाज अैकून शातेचा जीव भाड्यात पडला. तिने हलकेच कमलचें मस्तक अुचलून आपल्या माडीवर घेतले व अेका हाताने चमचा भरून लापशी कमलच्या तोडाजवळ नेली. कमलनें मुकाट्याने ती घेतली पण पुन्हा चमचा भरून तिच्या तोंडापुढे आला तेव्हा नाकारून तिने पाणी मागितलें.

" हे ग काय कमल, तुला बरं वाटायला पाहिजे ना ! मग अेवढं अगोदर घे. मग पाणी देअीन. "

" मला पाणी दे अगोदर—मला आता बरं वाटत आहे. "

" हे अेवढं घेअून पाणी प्यालीस म्हणजे तुला आतापेक्षा जास्त बरं खात्रीनें वाटूं लागेल. मग तूं—"

"शाते, खाअून पिअून मला आता नाही कधीच बरं वाटणार"

"अस भलतंच बोलू नये!"

"मग काय बोलूं तर?"

"अुद्यापासून खडखडीत बरी होअीन म्हण—"

पण कमल तसे म्हणण्याअैवजी अुलट रडावयालाच लागली. तिची समजूत कशी काढावी हे शातेला कळेना व ती अेखाद्या वेड्याप्रमाणें कमलच्या तोडाकडे पहातच राहिली.

कमलच्या तोडात चमचाभर लापशी व पाण्याचा घोट शातेने पूर्वीच दिला होता. तिची तहानमोड होअून तोडाची कोरड गेल्यामुळे तिला आता विशेष काही नको होते. शाता आपल्याकडे अेकसारखी टक लावून पहात आहे हे तिच्या ध्यानात आले, तीही भरल्या डोळ्यानी तशीच पाहूं लागली. जे काताला सागितले तेच शातेला सागण्याचे तिच्या मनात सारखे घोळत होते. कातािअतका अविश्वास शातेसंबंधी तिच्या मनात नव्हता. आपण सागितले की शाता कोणताही विचार न करता अेकदम होय म्हणेल ही तिची निश्चिती होती. शाता आपल्या पश्चात् काताची पत्नि झाली तर कात तर सुखी होतीलच पण शातेचें देखील काही वाअीट होणार नाही; तिच्या रूपाला, गुणाला, स्वभावाला व तिच्या माहेरच्या परिस्थितीला ते साजेल, शोभेल व आवडेल, तिचा जन्म त्या ससारात सुखाचा जाअील अशी कमलची खात्री होती. कमल स्वतःच्याच दृष्टीने विचार करीत असल्यामुळे शातेच्या स्वतत्र मनाची, स्वतंत्र विचाराची, सवत्या आवडी निवडीची कल्पनाच तिच्या मनात आली नाहीं; तिने ती आणली नाहीं व त्या तिच्या आसन्नमरण अवस्थेत ती सुचणेही शक्य नव्हते. आपल्यामागे आपल्या आवडत्या जीवाचे कसे होअील, आपल्या हाती जे नाहीं ते सोडून, जे आपणास शक्य आहे त्यासाठी अखेर

घटकेपर्यंत प्रयत्न करण्यास काय हरकत आहे हा अेकच विचार तिच्या ध्यानीं मनी खेळत होता.

भोळ्या, भावनाप्रधान कमलचा असलाच कसला तरी प्रयत्न चालू होता.

" शाते— " तिने पुन्हा सुरवात केली. " मला तुला काहीं सागावयाचं आहे, विचारावयाचं आहे."

" काय सागणार आहेस ?"

" अैकशील ना माझ ?"

" साग तर खरी !"

" पण रागावणार नाहीस ना ?"

" रागावेन काय म्हणून ?"

" मी सागेन ते नाही म्हणणार नाहीस ना ?"

" ते अगोदरच काय सागूं ?"

" मग अैकणार नाहीस म्हण म्हणजे—"

" ते तरी काय म्हणून ?"

" माझ्या जीवाभावाची मैत्रीण ना तू ? "

" अितक्या दिवसाच्या सहवासान आणि वागणुकीने तुला नाही का ते पटल ? "

कमल स्तब्धच राहिली.

" नशीब माझच ! " कमल निरुत्तर राहिली हे पाहून शातेने कपाळाला हात लावीत म्हटले.

" तस नव्हे ग शाते—"

" मग कसं तर ? "

" मी काही सागितलं तर रागावशील होय ? "

" वेडी कुठली ! मी का तुझ्यावर रागावेन ? हं बोल. तुला काय सागायचं ते खुश्शाल साग. अगदीं सकोच ठेवूं नकोस—"

कमलच्याविरुद्ध काहीं बोलावयाचें नाहीं; तिच्या कलाविरुद्ध वागावयाचे नाहीं; न जाणो, विरुद्ध बोलण्याचालण्याने अशा दुखण्यात तिला जास्त त्रासही होअील; तिच्या मनासारखे बोलले–वागले, होस हो करीत गेले तर तिच्या प्रकृतीला लवकर आराम वाटेल हे शाता जाणून होती आणि प्रथमपासून त्याच धोरणाने ती वागतही होती. मग ती आताच कमलला त्रास होअील असे का वागेल ? चांगला डॉक्टर किंवा वैद्य कसल्याही हेकट किंवा चिडखोर दुखणाअीतास आपल्या गोड–गोड बोलण्याने आणि लागट वागण्यानेच अर्धाअधिक आपलासा करून त्याच्या हळुवार मनावर प्रेमळ अधिकाराची छाप बसवीत असतो, किंवा अुत्तम परिचारिका हंसऱ्या चेहऱ्याने हातातील कडू औषधही सहज पचनी पाडून रोग्याला आजारातून अुठविण्यात डॉक्टर वैद्याअितकीच अुत्तरदायी होय असते; तेच श्रेय आता शाता कमलजवळ बसून आपल्या बोलण्या वागण्याने मिळवीत होती.

रोग्याशी वागण्याची कला शातेने चागलीच आत्मसात केली होती. नावाला अनुसरूनच की काय, ती कोणावरच कधी फारशी रागावत नसे. मग कमळवर—आणि त्यातूनही ती आजारी असताना—तर ती रागावणे शक्यच नव्हते.

" शाते, खरच, मरणाच्या दारी पडलेल्या या तुझ्या लाडक्या मैत्रिणीची गोष्ट तूं अैकशील का ? त्याप्रमाणें वागशील का ? "

" पण तूं मरूंच नको मुळीं ! " शाता गंभीरपणे म्हणाली.

" माझं म्हणण अैकणार कीं नाही, अेक साग. "

" मी मघाशींच तुला होय म्हटलं आहे—तूं जगावंस आणि जन्मभर तूं सागशील तें मी अैकत रहावं असं मी म्हणतें."

" नी ते मला तरी नको का आहे ? पण शाते, जास्त दिवस जगण्याचं भाग्य मला नाहीं हे मला पुरतेपणी अुमजल आहे. क्षणात बरं तर क्षणात प्राणातिक अवस्था होण चागलं का ? "

" पण तुझं तुला कळत नसलं तरी डॉक्टराना तर तुझी प्रकृती कळत आहे ना !"

" शाते, मी सागते तुला—डॉक्टर वैद्यापेक्षाही माझी प्रकृती मला कशी आहे हे चागलं कळतं हो ! आणखी सागूं का ? डॉक्टरानासुद्धा माझ्या प्रकृतीचं मानं चागल कळलं आहे; वरकरणी त्यांनी काहीही सागितलं तरी त्याना पक्क ठाअूक आहे की मी या दुखण्यातून खचित वाचत नाही म्हणून. म्हणूनच तर ते नसतं निमित्त काढून परगावी चालते झाले. मला समजत का नाही ते ? "

" कमल, तो विषयच सोडून दे. रिकामा त्रास पाहिजे कशाला ? डॉक्टर गेले तर जाअू दे. काताना सागून आपण वैद्याला आणवूं. वैद्यासंबंधानं तरी तुला आदर आहे ना ! " विषय बदलण्याच्या अुद्देशाने शातेने मध्येच म्हटले.

" माझ्या आदरावर का त्याच्या हातचं यश अवलंबून आहे ? ते काही नाहीं. अदृष्टात असेल तें काहीं केल्या होणारच होणार ! म्हणून म्हणते, शाते, माझी गोष्ट अैकणार ना तूं ? " कमलने शेवटी आपले बोलणे पुन्हा मूळपदावर आणलें.

" आता तुला कितीदा होय—होय—होय म्हणू ? "

" सागेन ते निमूट अैकेन, अेकदम अैकेन, आढेवेढे मुळींच घेणार नाहीं अशी माझ्या गळ्याची शपथ वहा." शपथ म्हणताच शांता अेकदम चपापून थाबली. " का ग थांबलीस ? शपथ वहात नाहींस ? माझं तूं अैकणार नाहींस ?" कमलनें पुन्हा प्रश्नाचा भडिमार केला.

" तुझ्या गळ्याची शपथ, तूं काय सागशील ते अैकेन. शपथ म्हण सुटली म्हणून ! साग आता तुझी गोष्ट–तुला बरं वाटावं म्हणून तुझ्या गळ्याची शपथ घेअून सागतें की, तूं मला काय वाटेल साग, ते मी तुझ अैकेन ! झालं आता !"

कमलला बरे वाटले. तिने निमिषमात्रच शातेकडे टक लावून पाहून आपली पुरती खात्री करून घेतली. त्या स्थितींतही शातेला आपल्या अशक्त हातानी जवळ ओढून, आनदाने व प्रेमाने कवटाळून, " किती ग शाते चागली आहेस तूं ! " असे ती काही तरी खोल आवाजात पुटपुटली.

" साग ना काय ते, कमल" मध्येच थोडा वेळ तसाच गेल्यावर शाता म्हणाली, " आता का संकोच ?"

" सागते ह ! पण—" पुढे काही सागण्याच्या अगोदर दाराकडे दृष्टि लावून कमल म्हणाली, " शाते, जरा दारातून पहा बरं, बाहेर काय चाललंय ते ! "

सागितल्याप्रमाणे शातेने अुठून दार किलकिले करून काताच्या खोली-कडे तेथूनच पाहिले. काताच्या खोलीची दारे सताड अुघडीं होती. दिवाही तेथे ढणढणत होता. शातेला वाटत होते की, आपण कमलजवळ येअून बसल्यावर व ती जरा स्वस्थ पडल्यावर कात आपल्या अथरुणावर पडून झोपेच्या स्वाधीन झाले असतील. पण प्रत्यक्ष तिला अुलटच प्रकार दृष्टीस पडला. कान्त आपल्या खोलीतल्या खोलींत दोन्ही हात पाठीशीं घेअून जोरजोरानें येरझारा घालीत होता. डोळे लालबुंद दिसत होते; कपाळावरच्या शिरा जाग्रणाने, काळजीने फुगल्या होत्या. त्याच्या दहापाच फेऱ्या होअीपर्यंत शाता दारातून त्याच्याकडे पाहात होती, ती परत आल्या-वर ' काय ग ? ' असा ठराविक प्रश्न कमलने केला.

" कान्त झोंपले नाहींत. खोलीत फेऱ्या घालीत आहेत " असें तिच्या प्रश्नाचे अुत्तर देअून शातेने पुढे म्हटलें, " ह्, साग आता, काय सागणार आहेस ते ! "

" शान्ते, पाहिलीस तिकडची अवस्था ! माझ्या काळजीनं कसं बेचैन व्हायचंय तिकडे ? माझ्यासारखीच तिकडचीही खात्री होअून चुकली आहे की, मी काहीं आता तगत नाहीं म्हणून ! आणि म्हणूनच तुला माझ्या मनातून विचारायचं आहे की—"

" काय ते ? " शान्तेने अधीरतेने प्रश्न केला.

" मी मरताना सुखात असावं असं तुला वाटत का ? "

" हे काय विचारतेस, कमल ? "

" माझ्या मागे तिकडच आयु य सुखाच जावं, अस माझ्याप्रमाणेच तुलाही वाटत नाही का ? तशी अिच्छा त धरणार नाहीस का ? "

" म्हणजे काय ? "

" तेच मी तुला सागणार आहे. तिकडचा पुढील संसार सुखाचा व्हावा अस तुला वाटत असेल तर ते तूच साधलं पाहिजेस !"

" अगबाअी ! कमल, काय म्हणतेस तू हे ?"

" माझी जागा तू स्वीकार ! अर्धांगी होअून तिकडचा ससार सुखाचा कर ! शाते, माझ्या गळ्याची आण वाहिली आहेस तूं !"

"पण कमल, तूं मरणारच नाहीस अशी माझी मनोदेवता मला ग्वाही देत आहे. "

" मी जगले तर प्रश्नच अुरणार नाही. मी मेले तरचाच प्रश्न आहे तो ! आणि जगले तरी आपण सख्ख्या बहिणीसारख्या—प्रेमळ मैत्रिणी-सारख्या—वागूं. सवतीचं नातं ठेवणारच नाही."

" पण तसं व्हायलाच नको !"

" पण मी मेलें तर ! मरताना मला हो म्हणून सुखी करणार नी मी मेल्यावर तिकडची अर्धांगी होअून तिकडे सुखी करणार ना !"

" काय सांगू कमल तुला ?"

" हो म्हण ! शाते, जिवलग मैत्रीण म्हणतेस, प्राणाला प्राण देण्याचं वचन देतेस, गळ्याची आण वहातेस आणि आता—असे आढेवेढे तिकडूनसुद्धा घेणं झालं; नाही असं नाहीं. पण अितके नाहीत हं ! तुझ्यापेक्षा तिकडचच प्रेम माझ्यावर अधिक आहे असं ठरलं तर !"

" काय म्हणालीस ? कातानीं कबूल केल आणि—"

" आणि आता तूंच कबूल करायला आढेवेढे घेत आहेस, माझ्यावर तुझं खरंखुरं प्रेमच नाहीं हे कृतीने सिद्ध करून देत आहेस, मी मरतानाही सुखी असूं नये अशी तुझी इच्छा आहे " कमल डोळ्यात पाणी आणून म्हणाली. " बरं तर–तुझी मर्जी ! मग आलीस तरी कशाला ? नी अितके दिवस माझ्यावर खोटं प्रेम दाखविलस तरी का ? मी याचपूर्वी मरून गेले असते तर त्यात तुझ काय बिघडलं असतं ? " अुशीत तोंड खुपसून कमल रडत रडत वाटेल ते बडबडूं लागली.

शातेने शातपणाने तिचे डोळे आपल्या पदराने पुसले व तिच्या तोंडावर हात ठेवला. आपले काळीज घट्ट करून मनाला आवर घातला आणि मनात परमेश्वराचें स्मरण करून ती म्हणाली, " कमल, मी तुला दिलेली गळ्याची आण, तुझ्या सुखाकरिता आणि काताच्या सुखाच्या संसाराकरिता पाळीन ! "

---

# प्रकरण सातवें

## मध्यंतरीं-

अकपरी कान्ताने व शांन्तेनें सर्वस्वी आपल्या म्हणण्याला अनुकूलता दर्शविली यामुळें कमलला अतोनात समाधान झालें.समाधान झाले म्हणण्यापेक्षा समाधान होअून चुकलें–खरेंच चुकले–असे कमलला वाटले. अेकादी गोष्ट करावयाची म्हटली म्हणजे तिची तड लागेपर्यंत ती करणाऱ्या व्यक्तीला जशी विलक्षण आतुरता लागते, त्या गोष्टीच्या सिद्धीसाठीं शरीराची व मनाची जशी अेकसारखी धडपड होत असते, आपल्याबरोबर आपल्या अिष्टमित्राचेही हाल हाल होत असतात आणि मग अितकें करून अेकादा ती गोष्ट मनासारखी घडून गेली म्हणजे त्या गोष्टीच्या घडण्याबद्दल मनाला कांहींच वाटेनासे होतें; अेकादे वेळी आपलें तें करणे चुकलेंच असेंही वाटण्याकडे मनाची प्रवृत्ति होत असते. कान्त आणि शान्ता यानीं आपल्या मनासारखें वागावयाचें ठरविल्यावर कमलेने आपल्या केल्या कृत्याचा भावी विचार केला नाहीं किंबहुना तशा त्या परीस्थितींत तिला ते करणेंच शक्य नव्हते. जगात आपल्यावर अितकी निस्सीम प्रेम करणारीं माणसे आहेत—अगदीं आपल्या जवळ आसपास आहेत—याचेंच विशेष सुख ती अनुभवीत होती. त्याच परिस्थितींत अगोदरच्या थकव्याची भर असल्यामुळें व आता प्रकृतीमध्यें जी थोडी चलबिचल झाली होती त्यालाही अुतार पडल्यामुळें कमलचा किंचित् डोळा लागला.

शांता किती वेळानें तरी शुद्धीवर आल्यासारखी झाली. आपण बोलण्याच्या भरात, भावनेच्या अुद्रेकांत, मैत्रिणीच्या मायाजालांत सांपडून

काय म्हणून गेलो, काय कबूल करून गेलो, याबद्दल किती तरी वेळानें तिच्या मनात अेकेक विचार भडक रूप घेअून येअूं लागले. तिने भानावर येअून जेव्हा कमलकडे पाहिले तेव्हा ती शातपणें झोपी गेल्याचें दिसल्यावर शाता तेथून अुठून घरात गेली. तिचे विचार तिच्याबरोबरच चालत होते. बाहेर जाताना तिला काताच्या खोलीकडे पाहाण्याचे धाडस झाले नाहीं.

'आपल्याकडे अुद्या कान्त कोणत्या दृष्टीनें पहातील ? आपण कान्ताकडे कोणत्या नजरेनें पाहूं ? कालपर्यंतची आम्ही दोघे आणि अुद्याचे आम्ही दोघे ! मग आपला सुधाकर ? आपला ! आता आपला कुठला ? ते विचारच आपल्या डोक्यांतून या क्षणापासून काढून टाकले पाहिजेत, त्याचें चित्र आपल्या डोळ्यापुढून दूर केले पाहिजे ! ॠणानुबंध जोडण्यापूर्वी असा तोडून टाकला पाहिजे ! ॠणानुबंध तोडायचा ?—'

शातेचे हृदय खरोखर फुटायची वेळ आली. ती आपलें हृदय दोन्ही हातानी घट्ट धरून डोळे मिटून सुन्न झालेलें मस्तक जवळच्याच भिंतीवर टेंकून तशीच किती तरी वेळ स्वतःला सावरून अुभी राहिली. ॠणानुबंधाला रजा देणे, प्रेमाला पारखे होणे, मैत्रिणीसाठी आपल्या सौख्य-सर्वस्वाचा अतुलनीय त्याग करणे किती कठीण, किती दुरापास्त ! पण अशा सर्व कठीण परीक्षात अुत्तीर्ण होण्यास आमच्याकडील बायका सहसा कुठल्याही देशातील बायकाना हार जाणाऱ्या नसतात. शातेने कमलजवळ सहज लीलेनें आपल्या सुख-सर्वस्वाचा होम अेका वाक्यानें केला. तें वाक्य अुच्चारताना जरी तिला विशेष वाटलें नाहीं तरी नंतर जसजसा ती त्याबद्दल विचार करूं लागली तसा आपल्या विराट यागाचा वणवा तिला स्पष्ट दिसूं लागून त्यांत आपण होरपळत आहो, आपली आअी होरपळत आहे, त्याचे चटके आपल्या मधुदादाला

लागताहेत आणि आपल्याप्रमाणेंच किंवा आपल्याहून किती तरी पटीनें अधिक आपल्या सुधाकराच्या जीविताचा डोंब उसळून देत आहेत असें प्रतिक्षणीं शातेला दिसून ती व्याकूळ होत होती. तिला निश्चयानें वाटलें की कमल आतां अगदी फारच थोड्या दिवसाची सोबतीण आहे म्हणून! ती जाणार, आपण दिलेल्या वचनाचे दिव्य आपल्याला करावें लागणार, आता आपण आपल्याकारिता नसून कमलकरिता नव्हे कमल करिंता तरी कसे, काताकरिताच! कान्त? नाही, अजून सुधाकराची मूर्ति डोळ्यापुढून पुसटत नाही, कान्ताची मूर्ति त्या दृष्टीने समोर पाहाण्याचे धाष्टर्य होत नाहीं. शातेच्या मनाची कोण तळमळ, तगमग ही! ज्याला शातेची खरी हकीकत कळेल तो तिच्या अतुल त्यागाची मनमुक्त स्तुतीच करील पण त्या स्तुतीने शातेचे जीवन सुखी कसे होणार? बायका अेरव्हीं कितीही चंचल मनाच्या व हळव्या दिलाच्या असल्या तरी प्रसंगीं कठोर मनाच्या आणि खंबीर दिलाच्या त्याच होअू शकतात. आता शाताही आपले मन कठोर, खंबीर करण्याच्या अुद्योगास लागली होती.

त्यानंतर तिला झोप मुळीच आली नाही. अितर अुद्योगाला लागण्यापूर्वी आपल्या आअीस, मधुदादास आणि सुधाकरास तावडतोब अेक पत्र तिने टाकलें. आदल्या दिवशी येणार असल्याचें पत्र गेले होते, आज गाडीच्या वेळी स्टेशनावर आपल्या पत्राप्रमाणे मधुदादा आणि सुधाकर-सुधाकर तर खात्रीनेच--आल्याशिवाय राहणार नाहीत, त्याची निराशा झाल्याशिवाय राहणार नाही हे तिच्या लक्षात येअून क्षणमात्र तिला कसेंसेंच झालें. अद्या तरी त्यांची फसवणुक होअूं नये, पुन्हा त्याना हेलपाटा पडूं नये म्हणून आज पत्र--नव्हे, खरे म्हटले तर तारच--पाठवावयाला पाहिजे होती. पण तारेचे प्रयोजन यावेळीं तिला वाटलें नाहीं म्हणून तिनें पत्र लिहिण्यास घेतले. पत्र लिहितांना ती पुन्हा अडखळली, काय लिहावें,

कसें लिहावें असा विचार येअून तिनें सारें मोघमातच लिहिले. कमळचें दुखणें अेकाअेकी अुलटल्यासारखे वाटत असल्यामुळें आपल्याला निघतां आलें नाहीं अेवढाच विशेष मजकूर म्हणून तिने लिहिला; बाकीचें ब्रह्माड तिनें लिहिलेंही नाही आणि तिला लिहिवलेही नसतें.

पत्र लिहून झाल्यावर ती नित्याच्या अवांतर अुद्योगाला लागली.

अिकडे कान्ताची मनःस्थिति काय होती ! शांता कमलच्या खोलींत गेल्यानंतर तो जो बाहेर पडला तो थोडा वेळ खोलींतल्या खोलींतच येरझारा घालीत होता. त्याला नंतर झोंप येणें शक्यच नव्हतें, वाचनाकडेही लक्ष जाणे अशक्य होते त्याला वाटे, आताच बाहेर जावे व अेकाद्या डॉक्टराना घेअून यावेच. कमल बरी होअील, आपल्या प्रेमाच्या संसाराचा सारीपाट मधल्या मधेंच अुधळून जाअूं नये याकरिता आपण आत्यंतिक प्रयत्न केले पाहिजेत हा अेकच विचार मस्तकात प्रामुख्यानें थैमान घालीत असल्यामुळे अवातर गोष्टी काताच्या मनात येत नव्हत्या, आल्या तरी स्थिर होत नव्हत्या, आणि स्थिर झाल्या तरी त्या महत्त्व पावत नव्हत्या. कमल आपल्याशीं बोलली काय, आपण तिला सागितले काय हेंही त्याला आठवत नव्हतें. आजारी माणूस चिडखोर बनते आणि त्या चिडखोर आजाऱ्याच्या बोलण्यास होस हो दिला नाहीं तर आजार लाबतो म्हणूनच कमल बोलली व आपण तिला रुकार दिला अेवढ्याच गोष्टी मधून मधून त्याला आठवत होत्या. पण हें कोठपर्यंत ! सकाळीं अुजाडल्यावर त्या वेळचे अुद्योग आठवून शांतेकरिता स्टेशनवर जाण्यासाठीं गाडी सांगावयाची आहे हें मनांत आलें तेव्हां आणि त्याबरोबर शांताच आपला सकाळचा चहा घेअून समोर आलेली प्रत्यक्ष पाहीपर्यंतच !

शांता समोर आली. त्यानें तिच्याकडे आपादमस्तक पाहिलें. अगदीं प्रथमच शांतेकडे यावेळीं निराळ्या दृष्टीनें आणि वेगळ्या भावनेनें कांतानें

पाहिले होते. आपल्याला कमल सोडून जाणार, शाता तिच्या जागी येणार आजवरचा कमला-कान्त काही थोड्या काळात शान्ता-कान्त होणार असले किती तरी विचार भराभर काताच्या मनात क्षणार्धांत येऊन गेले.

शान्ता समोर आली. कान्तापुढे तिनें चहाचा कप ठेवला. तिनें आज या वेळी मात्र मान वर करून कान्ताकडे पाहिले नाही. कान्ताने आपल्याविषयीं कमलजवळ कबुलीजबाब दिला आहे हे तिला माहीत असल्यामुळेच तिची मान वर झाली नाहीं. आपल्याप्रमाणेच कमलनें शान्तेकडून कबुलीजबाब मिळविला असेल अशी कान्ताची मुळींच कल्पना नसल्यामुळे तो मात्र तितक्या निर्भयपणाने शातेकडे पहात होता. तिला समोर पाहील्यावर कमल कीं शाता, दोघीपैकीं आपण कोणाच्या सहवासात जास्त सुखी होऊं, शाता कमलला विसरावयाला लावील की घडोघडी आठवण करून देईल, आपण जसा कबुलीजबाब कमलजवळ दिला तसाच कमल ज्या वेळीं शातेजवळ मागेल त्यावेळी ती काय म्हणेल, बिनशर्त होय म्हणेल की आढेवेढे घेईल, आपल्याला होय म्हणणे जितके सोपें गेले तितके ते हिला जाईल का, तिने होय म्हणणें म्हणजे मैत्रिणीची मर्जी राखणें आणि आपण तिला पसंत पडणे या दोन गोष्टी त्यात येतात, कदाचित् शातेच्या सहवासात आपण सुखी होऊं, कमलला सर्वस्वी नाहीं तरी अंशतः विसरून जाऊं—पण शाता आपल्या सहवासात सुखी होईल का? तिला आपले घर, आपण, आपली परीस्थिति हीं बरीं वाटतील का, मानवतील का, या प्रकारचे हजारों विचार समोर शातेला पाहाताच कान्ताच्या डोक्यात दौड करून गेले. क्षणभर तो भानच विसरला. आजपर्यंत नाहीं पण आज शाता चहा ठेवून त्याच पावलीं तेथून परत फिरली. कान्ताचा चहा घेणे होईपर्यंत ती उभी राहिली नाहीं किंवा त्याच्याशीं एकादा शब्दही बोलली नाही. शान्ता परत फिरल्याचें लक्षात येताच तो

खाडकन् भानावर आला. त्यानें स्वतःच्या मनःस्थितीची सावरासांवर करून तिला हाक मारून परत बोलाविले.

" आता कसं आहे ? " चहाचा कप हातात घेत कान्त म्हणाला.

" बरं आहे. किंचित् डोळा लागला आहे. "

" भ्यायचं काही कारण नाहीं ना ? "

" असं मला वाटतं " शातेनें मोघम अुत्तर दिले.

" पण डॉक्टराना आणलंच पाहिजे. चहा घेतो आणि जातोंच तिकडे !"

" तशी काहीं घाअी करण्याचं कारण मला वाटत नाहीं. "

" पण मला वाटतं, स्टेशनवर जायला गाडी येअीपर्यंत डॉक्टर येअून आपणा सर्वांसमक्ष तपासून, पाहून, सागून गेले म्हणजे बरं ! मग कोणालाही काळजी करण्याचं कारण अुरणार नाहीं. गाडी अगदी वेळेला येअील. मी रात्री मुद्दाम तस सागून ठेवल आहे. "

"स्टेशनवर ? पण मी आज जायचं रहित केलं आहे. मी तसं मधुदादाला आताच पत्र लिहून कळवलही आहे. कमलला चागल बर वाटल्याशिवाय मी या घरातून जाणे शक्यच नाहीं. "

कान्ताचे लक्ष मध्यंतरी कोठे भटकत होते कोण जाणे. शान्तेचे सर्व संभाषण त्याने अैकलेच नाही म्हणाना ! 'मी या घरातून जाणे शक्यच नाहीं' अेवढेच शेवटचे वाक्य मात्र कान्ताच्या कानात घुसले. त्यानें त्यासरशी अेकदम शान्तेकडे टवकारून पाहिले.

' काय ? शान्ता कायमची माझ्या घरात राहणार ? माझी होणार ? तिनेही आपल्या मनाची तयारी केली आहे ? कमलनें तसे सागण्यापूर्वी तयारी दर्शविली ! मनोमन साक्ष म्हणतात ते हेंच असूं शकेल का ? जसें कमलच्या मनांत आलें तसेच शातेच्याही मनांत कसे आलें ? शाता राहणार म्हणजे खरंच कमल जाणार ! ' असें कान्ताचें मन हेलकावे घेअूं

लागले. अेका फुलातील मध सपला; कमळ शुष्क झाल्यामुळेंच कान्ताचा मनोभृंग शान्तेच्या हृदयपुष्पाभोवती गुजारव करण्याची अिच्छा करूं लागला ! पुरुषाच्या वर्तनाला बोल कोणी लावावा !

शान्तेने लिहिलेले पत्र नोकराकडून टाकविले; कान्तानेही सागून ठेवलेली गाडी रहीत केली व विशेष काही बोलणे न होता तो डॉक्टरकडे गेला. अेक, दोन, तीन, चार दिवस ओळीने गेले. या अवधीत कमलची प्रकृती सुधारली नाहीं किंवा जास्त बिघडलीही नाहीं जास्त बिघडत नव्हती तरी अेकदा जी समजूत कमलच्या स्वतःच्या बाबतीत झाली होती आणि तिने शातेची व कांताचीही तशीच करून दिली होती ती मात्र अजूनपर्यंत सर्वांची जशीच्या तशीच होती. जशी काही तिघेही आपापल्या परीने कमलच्या मृत्यु-घटकेची वाटच पहात होते. डॉक्टर रामराव अजून परगावाहून परत यावयाचे होते. दुसरे डॉक्टर येत असत ते रोग्याला मनापासून तपासण्यापेक्षा आपली फी खरी करण्याकरिताच येत होते की काय असा अंदेशा घरातल्या चाणाक्ष माणसाना सहजासहजी आल्याशिवाय राहात नसे. या चारपाच दिवसात आपोआपच आणखी किती तरी गोष्टी विलक्षण अशा होअून गेल्या. शातेच्या पत्राचें अुत्तर मधुकराकडून आले, अेक स्वतत्र पत्र सुधाकराचेही आले. अक्षरावरून सुधाकराचे पत्र ओळखण्यास काहीच कठिण नव्हते. शान्तेने ते पत्र हातीं घेतले व तिला ते फोडून वाचावेसे वाटूं लागलें पण वाचले की मन चलबिचल होअील, पत्राला अुत्तर लिहिण्याचा मोह अुत्पन्न होअील, अुत्तराला प्रत्युत्तर ठेवलेलेंच असे फिरते चक्र सुरू होअून आपले मन आपल्या ताब्यात राहणार नाही तेव्हा त्या पत्राच्या चक्रातून सुटावयाचें तर आतांच मनाची खंबीरी करून सुधाकराचें पत्र न वाचता फाडून टाकलेच पाहिजे असे पुन्हा पुन्हा मनाशी टरवून आणि मनाचा मोठा हिय्या करून तिनें

सुधाकराचे--आपल्या प्रियकराचे---पत्र न वाचताच कृष्णार्पण म्हणून फाड-ण्याचे दिव्य पार पाडले. तिला वाटले असे दिव्य अेकदा केले म्हणजे पुनश्च तशी पाळी येणार नाही पण अनुभवाने ती तिची कल्पना लटकी ठरली. नंतर आठवड्यातून दोन दोन, तीन तीन पत्रे सुधाकराकडून अेकसारखी येअू लागली. तिचे अुत्तर जात नसे म्हणूनच अधीर सुधाकर शातेवर पत्राचा पाअूस पाडूं लागला होता. त्याचा वर्षाव हिमालयाची शातता धारण करून शाता सहन करीत होती.

मनुष्यस्वभावच आहे की कोणीही सधि न देता मानवी प्राणी आपल्या सुखसोअीकरिता सधि शोधीत असतो, प्रसंग निर्माण करीत असतो. अुलट कान्ताने किवा शातेने स्वतः प्रयत्न न करता त्याच्यापुढे सधि हात जोडून अुभी होती, प्रसंग आपण होअून दत्त म्हणून चालून आला होता. स्वाभा-विकच घरातल्या घरात वावरताना शातेचे प्रत्येक कृत्य जरी नेहमी प्रमाणेच तिच्या हातून घडत होते तरीही आपले घर आहे असे समजून, आपला ससार आहे असे मानून, कात आपल्या जन्माचा सागाती आहे असे कल्पून ती वागत असावीशी त्रयस्थ पाहाणारास वाटले असते. शांता काताशी बोलली काय किंवा कात शातेशी बोलला काय दोहोचा अर्थ त्रयस्थास अेकाच अर्थी घेता येण्यासारखा होत असे व तो म्हणजे अेकमेकाची मने अेकमेक वागण्याबोलण्याने घडोघडी आकर्षण करून घेत आहेत असाच असे. शेजारी पाजारी त्याच अर्थाची कुजबूज आपआपसात करूं लागले होते.

नवे डॉक्टर ठराविक वेळीं येअून जात असल्यामुळे डॉक्टर रामरावाची चौकशी करण्याचे कान्ताच्या मनातच आले नाहीं. अेका परीने कमलच्या मनाप्रमाणे झालेले असल्याने तिच्या मनाची तळमळ, तलखी शात झाली होती. आळीपाळीनें तिच्याजवळ कोणीना कोणी असल्याने तिला तशाही परिस्थितींत हवें ते सौख्य मिळून समाधानाला जागा होती. आता कम-

लची केव्हाही मरावयाचीसुद्धा तयारी होती. तिला जगात आपण बरे होण्यास कोण्या धन्वंतऱ्याकडून औषध मिळेल याबद्दल आशाही उरली नव्हती व उत्कंठाही राहिली नव्हती. तिच्या स्वतःच्या मनाची अशी तयारी झाली त्या वेळीं तिच्या संबधाने शाता किंवा कात उदासच राहिले असल्यास नवल नाही. त्याची चालू वागणूक म्हणजे कमलला कुठल्याही प्रकारचा विशेष त्रास न पोहोचूं देता तिचे अखेरचे क्षण सुखात जावे अशासाठी सर्व परीने जपणे अशीच होती. आज ना उद्या आपली हक्काची वस्तू होणार ही खात्री वाटूं लागल्यामुळे, मावळत्या चद्राकडे दुर्लक्ष करून उगवत्या सूर्याचे स्वागत करण्यास जग जसे सिद्ध असते तशीच अवस्था कान्ताची होऊन, तो प्रति दिवशी शातेशीं वागताना–बोलताना आपुलकीनें, जिव्हाळ्यानें, प्रेमाने आणि मनाच्या मोकळेपणान वागूं लागला होता. शान्ता स्वतःच्या वर्तनात विशेष फरक न करताही 'मागील अंकावरून पुढे चालू' या ढबीनेच वागत असली तरी तिची सहज वागणूक, गोड हसणे, मधुर बोलणें, कान्ताविषयीच्या कर्तव्यातील तत्परता आणि मिळूनमिसळून वागण्यातील सहजता यावरून शान्ताही कान्ताप्रमाणेच त्यागाच्या सोंगात स्वार्थाचे सुख तत्परतेने शोधीत आहे असे कोणीं म्हटले असतें तर ते अगदीच अनाठायी ठरले असते कीं काय कोण जाणे!

---

# प्रकरण आठवें

## रामबाण अुपाय

“काय आहे ते हातात ? कसला कागद आहे ? पत्र आहे वाटत ? लपवून काहीं नाही म्हणून मान डोलवतेस काय ? वाः ! छान् ! पत्रच आहे ना ते ?”

“पत्रच आहे !”

“कुणाचं ? आअीच ?”

“नाहीं.”

“मधुकरपताच ?”

“अंऽऽअं ह ! त्याचं नाही—”

“मग कुणाच आहे तर ?”

“पण कुणाच का असेना ? पत्र मला आलेलं आहे. दुसऱ्याचा कोणाचाही त्यात काहीं संबध नाही. खाजगी पत्र आहे.”

“पत्र खाजगी आहे ? आणि मला न दाखविण्यासारखं ? अेकूण मला न कळण्यासारख्या खाजगी आणि गुपित गोष्टी हृदयाच्या पेटीत अजून आहेत तर ?”

काताचे हे वाक्य अैकून शाता अेकदम खजीलच झाली. अितका वेळ धीर करून ती काताकडे निर्भयपणे पहात होती. पण आता तिची नजर अेकदम खाली वळली. अंग थरथर कापूं लागून तिच्या तोडून शब्द फुटेना. कांतापासून लपविण्याकरिता पत्राची अर्धवट घडी करीत ती पदराखालून पोलक्याच्या खिशात घालीत असता तिचा हात तसाच जागच्या जागीं राहिला. कान्तही जागच्या जागींच थबकला.

अलीकडे शाता काताशी अधिक मोकळ्या मनानें वागूं लागली होती. कंपित स्वराने, हंसण्याच्या लकबीने, पदराच्या सावरण्याने आणि डोळ्यांच्या लाडक्या भावाने ती काताविषयींचा आपला भाव व्यक्त करूं लागली होती. काताने आणलेली ताजीं फुले वेणीत घालणे, त्याच्या कुठल्याही बोलण्याची—अेकाद्या साधारण शाब्दिक कोटीचीही—वाजवीपेक्षा जास्त स्तुति करणे, त्याने स्वतःकरिता किंवा तिच्याकरिता कसलाही जिन्नस आणला तरी त्याची मनमुक्त वाखाणणी करणे, त्याच्या तत्परतेविषयी पुन्हा पुन्हा चागले बोलणे यामुळे कान्ताच्या सहवासजन्य प्रेमाचा म्हणा किंवा प्रेमजन्य सहवासाचा परिणाम शातेच्या मनावर होअून ती स्वतःला न कळत—किंबहुना थोडेसे कळूनही—त्याच्या प्रेमात गुरफटत चालली होती. आपल्या हृदयावर कान्ताचा ताबा ती अधिकाधिक प्रमाणावर चालू देअूं लागली होती. तिच्या त्या तशा वागण्याने कान्तालाही, परस्पराच्या हृदयात आपपर भाव मुळींच राहिला नाही असे वाटूं लागले होते.

काताने आपल्या अंतःकरणात गुपित असे काहीच ठेवले नव्हते. प्रसग साधून त्याने आपले सर्व अंतःकरण तिच्यापुढे अुघडे करून टाकले होते. पण शातेला स्त्रीस्वभावानुसार तसे करणे अशक्य होते. ती प्रत्यक्ष व अेकदम बोलणार कशी ? पण तिच्या वर्तनातच हलके हलके फरक पडूं लागला होता. तिला सुधाकराविषयीं प्रथम प्रथम बरेच कठीण गेले व आत्मसंयमनही बरेच करावे लागले. कमलला दिलेल्या अभिवचनाची आठवण प्रत्येक वेळीं प्रथम प्रथम तिला करावी लागे पण पुढे तेही सोपे होअून बसले. जी शाता पहिल्यादा सुधाकराचे पत्र फोडून वाचावयालाही धजत नसे—वाचण्यापूर्वीच फाडून टाकी—तीच आता ते वाचून मगच फाडून टाकी. तो बिचारा प्रत्येक पत्रांत साम–दाम–भेद अशा प्रकारांच्या मजकुराचा मारा, तिच्या हृदयाचा बालेकिल्ला आपल्या हक्काचा रहावा

म्हणून, तिच्यावर करीत होता तर दिवसेदिवस तेच तिला नकोसें झालें होतें. सुधाकरावरील सहवासी प्रेम बरेच दिवसाच्या दूरत्वामुळें स्वाभाविकच शिथील होअू लागून तिच्या प्रेमाचा वेल शेजारच्या कान्तरूपी वृक्षावर सर्व बाजूंच्या अनुकूलतेनें चढूं लागला होता. तिला स्वतःलाच सुधाकर नकोसा होअू लागून कात हवासा वाटूं लागला. त्यामुळे ती त्याच्या कोणत्याही प्रकारच्या पत्राला अुत्तर देत नव्हती. ती आअीला किंवा मधुदादाला पत्रे लिही त्यात सुधाकराचा अुल्लेख आठवणीने करावयाचा विसरत असे! त्यामुळे सुधाकराचे कसलेही पत्र आले तरी ते आता ती सहजपणाने वाची आणि लीलेने त्याच्या चिंध्या करून भिरकावून देत असे.

शाता पावलापावलाने काताला काबीज करीत होती—सुधाकराला विसरून काबीज करीत होती—तर कातानें आपल्या मतें तिला केव्हाच काबीज केले होते. शातेला सुधाकराविषयी जसे काहीं वाटेनासे झाले होते तशीच अवस्था काताची कमळेविषयी होअून राहिली होती. ‘कमल आता केव्हा ना केव्हा तरी मरणारच—मग तिने आता शक्य तितक्या लवकर मरावे म्हणजे तीही हालअपेष्टातून सुटेल व आपणही कायमचे तिच्या पाशातून निसटूं’ येथपर्यंत काताची विचारसरणी पोहोचली होती! कमलकडे अजून दोघेंही पहात, पण ते फक्त कर्तव्य म्हणूनच—प्रेमाने नव्हे! कमलवर दोघांचेही प्रेम अुरलें नव्हते व अुरण्यासारखे कमलजवळ काहीं राहिलेही नव्हते. शातेचे काताकडे आणि काताचें शातेकडे प्रेमाचे जबर आकर्षण सहजसुलभतेने सुरू झाल्यावर बिचाऱ्या सुधाकराच्या प्रेमाच्या चिंध्या झाल्या किंवा कमल कळीकाळाच्या कंठात जितक्या लवकर मिठी मारील तितकें चांगले असे वाटूं लागलें तर त्यांत नवल काय!

यात कोण कोणाला नावें ठेवणार! कोण कोणाला वाअीट म्हणणार! मधुकराने किंवा आअीनें जर शांतेला आपल्या प्रेमाचा ओघ सुधाकरा-

फिरून वळवून तो कांताकडे–कमलच्या मृत्यूनंतर त्याच्या दृष्टिपथात आलेल्या सुखवस्तु, शहाण्या आणि देखण्या कांताकडे–वळीव असे सांगितलें असते, तर शांतेने आओीचे, भावाचें किंवा दुसऱ्या कोणाचेंही तरी अैकले असते का? वडीलधाऱ्यांना मुलामुलींच्या अंतःकरणाची कल्पना नसते; त्यांचे स्वतंत्र अस्तित्व, त्यांची स्वतंत्र बुद्धि वडील माणसे कबूलच करीत नाहींत; प्रेमाला व्यवहारी बाजारांत आणून त्याची कवडी किंमत करतात असें किती तरी प्रकाराने अकांडतांडव यांच शांतेने केले नसते का? कांत प्रथम वर नाही म्हणून नाकारलाही असता. सुधाकरावरील प्रेमामुळें आपण त्याच्या गरीबीचाही स्वीकार करून कांताच्या दूषित श्रीमंतीचा अुघड अुघड धिःकार करीत आहो असेंच शांतेनें पुन्हा पुन्हा बजावून सांगितलें असतें व आपलाच हट्ट शेवटास नेला असता!

पण आताचा प्रसंग शांतेने स्वतःच निर्माण केला होता. तिच्या शहाण्या मनानेंच कांतापुढे सुधाकर फिक्का पडतो असें ठरविलें होते मग येथें बोल कोण कोणास लावणार?

जगांत परमेश्वरानें बुद्धि ही फक्त मानवी प्राण्यालाच दिली आहे, म्हणूनच तो सर्व जीवजाताहून श्रेष्ठ व चांगला असें मानण्यात येतें. पण कांताची किंवा शांतेची बौद्धिक आंदोलनें पाहिली, बदलत्या परिस्थितींत आपापल्या आवडी निवडीप्रमाणें आणि सोयीसवडीप्रमाणें त्यांना, आपलें तेंच बरोबर अितरांचे चूक या समजुतीनें वागतांना पाहिलीं म्हणजे मानवी प्राणी श्रेष्ठ व चांगला का मानावयाचा हेंच समजत नाहीं. बुद्धि व ज्ञान देअून परमेश्वरानें मानवाला देवपदीं नेलें आहे असें म्हणण्यापेक्षा त्यांना अधमाधम बनविलें आहे असें म्हणावेसें वाटतें तें अशाच वेळीं!

सुरवातीला दिलेला संवाद शांता–कांतामध्यें चालला होता हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. तिच्या हातांत सुधाकराचें पत्र होतें.

आणि ती तें कमलच्या खोलीकडे जाता जाता वाचीत होती. कमलचे सकाळचे पथ्यपाणी होअून तिचा किंचित् डोळा लागला होता. तेवढ्यात शाता आग धुवून नुकतेच काताने तिच्याकरिता आणलेले अस्मानी रंगाचे जरीकांठी पातळ नेसून, रेशमी ब्लाअूझ घालून, सकाळीच ताजी पिवळ्या गुलाबाचीं पानासुद्धा काताने आणलेली फुले वेणीत खोचून बाहेर येत होती त्याच वेळीं तिच्या हातात पत्रे पडली. काताची पत्रे त्याच्या टेबलावर ठेअून, अक्षरावरून ओळखलेले सुधाकराचे पाकीट ‘ आज काय म्हणताहेत राजेश्री ’ असें काही तरी पुटपुटत तिने फोडले. ती ते वाचीत असताच अितका वेळ कुठें बाहेर गेलेला कात परत आला व त्याने नेहमीं-प्रमाणे ‘ काय आहे ’ म्हणून तिला विचारले. शातेने चमकून वर पाहिलें. हातात सुधाकराचे पत्र आणि समोर कात अुभा ! सुधाकराचा मागमूसही तिने अजून कोणाला लागूं दिला नव्हता ! तोच लागण्याची वेळ आज अशी स्वाभाविक आली ! अितके दिवस त्याचीं पत्रे येत होती पण अशी सूर्यजयद्रथ होण्याची आजच्यासारखी वेळ पूर्वी आली नव्हती. काताच्या आकस्मिक येण्यानें व अेकदम विचारण्याने शाता गोंधळली. तितक्यां-तूनही तिने अुडवाअुडवी करण्याचा प्रयत्न हंसून केला पण तोच तिच्या अंगलट आला. काताने अचूक बोलण्यात पकडल्यामुळे ती गोरीमोरी व अधोवदन झाली. काताला काय अुत्तर द्यावे हे तिला सुचेना.

‘ सुधाकराची कल्पना याना आली, त्याचें आजचे पत्र नजरेस पडले तर त्याच्या मनात आपल्याबद्दल भलता विकल्प येअील, ज्या प्रेममंदि-राची अुभारणी दर दिवशी हजारो प्रकारांनीं होत आहे ते अर्धवटच कोसळून पडेल ’ अशा कांहीं विचित्र कल्पना तिच्या मस्तकात स्वैरपणे वावरूं लागल्या. सुधाकराचे पत्र काताला दाखवावे कीं नाही, त्याचा अितिहास सागावा कीं नाहीं असें शातेच्या मनात येतें न येते, ती आपल्या. मनाचा

कांही अेक निश्चय करण्याकरिता घुटमळत आहे तोंच कांत ' अजून मला माहीत नाहीं असं गुपीत हृदयात आहेच तर–' असे लागणारे शब्द बोलून गेला. ती थिजली, गोंधळली. बोलून गेल्यावर कांतालाही कसेसेच झालें. भलतेच–शांतेला न आवडणारे भलतेच–बोलून गेलो, असे आपण बोलावयास नको होते असे कांताला वाटून त्याचीही स्थिति चमत्कारिक झाली ! क्षणभर तो जागच्याजागी थबकला ! तो अेकसारखा तिच्याकडे पहात होता, त्याला शांतेची क्षमा मागावयाची होती.

तशाही स्थितीत शांता त्याला किती सुंदर, किती मोहक व किती रमणीय दिसली ! ते पातळ नेसण्याची ती मोहक तऱ्हा, पातळ पातळातून पोलक्याचा दिसणारा आल्हादक रंग, केशरचना, बुचड्यावरील फूल, बावरल्यामुळे कपाळावर तरारलेले घर्मबिंदू, ती तशीच अुभी राहाण्याची मोहक अैट ! पुढे सरकून कांताला तिची समजूत काढणे भाग वाटले म्हणून तो हलके हलके शांतेजवळ जाअूं लागला. पायाच्या नखावर दृष्टी खिळवून ती अजून जागच्या जागींच अुभी होती. पदर वाऱ्यावर अुडत होता त्याकडे सुद्धा तिचे लक्ष नव्हते !

शांता अुभी होती आणि कांत मंत्रमुग्ध नागाप्रमाणे सावकाश तिच्या कडे आकर्षिला जात होता. ते ठिकाण म्हणजे कमल ज्या खोलींत निजलेली असे त्या बाहेरचे—भिंतीच्या लगतचेच—होते. अितकेच नव्हे तर त्या भिंतीला कांचेच्या तावदानाची खिडकी होती. ती बंद होती तरी प्रकाशाच्या परिवर्तनामुळे तावदानातून आतला खोलीचा भाग कोणालाही दिसण्यासारखा नव्हता !

त्याच खिडकीच्या आतल्या बाजूस पाण्याचा ताब्या, फळफळावळे, औषधाच्या बाटल्या अित्यादी जिन्नस ठेवण्याची वहिवाट कमलच्या आजारीपणापासूनच पडली होती. आपल्या मृत्यूनंतर जी व्यवस्था आपल्या घरात

व्हावी अशी वेडी अिच्छा धरून कमलने जें काही सत्कृत्य केलें होतें त्याचाच वृक्ष किती फोंफावला होता, त्याला फुलेंफळें येण्याची वेळ कशी आली होती, त्या वृक्षाला कशी टवटवी लाभली होती याची चालूं घडी-पर्यंत तिला कल्पनाही नव्हती. तिच्याशीं वागताना शाता काय किंवा कात काय, अवांतर गोष्टीचा दादपत्ता तिला मुळींच लागूं देत नसत, वर-पागीं तरी दोघेही चांगले वागत.

याच वेळीं आत खोलींत कमल गुंगीतून जागी होअून अंथरुणात अुठून बसली होती. तिला तहान लागली होती व खिडकींत डाळिंबाचे दाणे पाहून तिला अुगीचच त्यातील दोन दाणे तोंडात टाकावेसे वाटले. पुष्कळ दिवसाचा परावलंबीपणा आणि आजाराचा अशक्तपणा कमलच्या अंगात मुरल्यामुळें तिला मनांत असूनही किती तरी वेळ अुठण्याची अिच्छा होअीना. कुणी तरी यावें व आपल्याला पाणी द्यावें, डाळिंबाचे दाणे द्यावे असें तिला वाटत होते. पण तिच्या दुर्दैवानें बराच वेळ कुणी तिकडे फिरकलेच नाहींत. ती रागावली. शातेला हांक मारावी अशी सुद्धां तिला अिच्छा झाली पण शाता अितकें करीत असूनही आपण तिच्यावर थोडक्यासाठीं रागावलों तर तिला किती वाअीट वाटेल ही कल्पना तात्काळ येअून तिनें मग हाक मारली नाहीं. कुणी येअील म्हणून आणखीसुद्धां तिनें थोडा वेळ वाट पाहिली. मग मात्र तिला दम निघेना. तोंडाला जास्तच कोरड पडूं लागली म्हणून तिनें मनाचा निर्धार केला, पलंगाच्या कांठावर दोन्ही हात मजबूत ठेवले, अेकेक पाय खालीं घेतला, पायांत सपाता घातल्या व बळ करून ती जागेवरून अुठली आणि तशीच जीव मुठींत धरून हलके हलके ती त्या खिडकीजवळ गेली !

अितकें कसें काय चालवेल अशी तिला धास्ती होती पण अनुभवानें ती फोल ठरली. जरा वेळ लागला, दमल्या सारखेंही झालें पण आस्ते

कदम ती कशीतरी खिडकीजवळ तर गेली ! किती दिवसात तरी आपण होअून—खोलीतल्या खोलीत का होअीना—ती चालली. तिचे तिलाच बरे वाटून आनंद झाला. आपण जितके आपल्या आजाराला भ्यालो आहोत तितका काही तो भितीदायक नाही; तसे म्हटले तर अर्धा खरा आजार आणि शातेसारखी मैत्रिण झटायला आहे, कातासारखा पती शब्दाशब्दाला थुंकी झेलायला तत्पर आहे म्हणून अर्धा कौतुकाचा सोंगाडा आजार आहे अशी तिने प्रथमच आपल्या मनाजवळ प्राजलपणे कबूली दिली. सवड सापडली कीं माणसाला फावते ते असेच, असेही तिच्या मनात आले. आपल्या श्रीमती दुखण्याचे—अर्ध्या अधिक खोट्या दुखण्याचे—स्वतः तिलाच हसूं आले. ती खिडकीजवळ जरा वेळ थाबली, हलकेच ताब्यातले पाणी लहान भाड्यात ओतून ते तोंडाजवळ आणले. हातातील भाडे तिने अुचलले तसे साहजिकच तिची मान मागे गेली, कपाळ व डोळे जरा वर झाले व ते खिडकीच्या तावदानासमोर आले तोच—

कात शातेजवळ अुभा–तिची हनुवटी त्याने हाताने वर अुचललेली–शातेच्या डोळ्यात असूं व तोंडावर हसूं–कातही स्मितमुख काही तरी पुटपुटत आहे—ओठ हललेले दिसले पण काचेतून अैकावयाला येत नव्हते.

कमलने ते दृश्य पाहिले ! प्रत्यक्ष आपली मैत्रिण ! प्रत्यक्ष आपला पति आणि असला ओंगळ प्रकार ! आणि तोही आपण धडधडीत जिवंत असता ? असे विचार येअून तिचे डोके भिरभिरले, डोळे तारवटले व तिच्या अगाची आपादमस्तक लाही लाही झाली. तिची तहान कुठच्या कुठे पळाली. पाण्याचे भाडे तिने तसेच खालीं ठेवले, डाळिंबाचे दाणे खाण्याची वाछा जागच्या जागीच मरून गेली.

तिच्याने ते दृश्य फार वेळ पहावले नाही. आगात क्रोधाचा, तिरस्काराचा आणि मत्सराचा दारुण संचार झाल्यामुळे ती किती वेगाने–तिच्या

आगात कुठून बळ आले कोण जाणे–आपल्या बिछान्यावर गेली; आगा-वर पाघरूण ओढून घेतले; अुशीवर कपाळ आपटून हात पाय ताणले; नाना प्रकार केले. तिच्या डोक्याने विचाराचे ताडव माडले. त्या भरात समोर पाहिलेले दृश्य म्हणजे आपल्याच कृतीचे ते कटु फळ आहे, हें मात्र ती अजीबात विसरून गेली होती !

खोलीचे दार बद होतेच. तिला अेकदम हुंदका आला, ती तोड दाबून धरूं लागली तसा श्वास कोंडून ठसका आला व खोकल्याची अुबळ आली. खोकल्याच्या आवाजाबरोबर बाहेर कांहीं हालचाल झाली.

खिडकीच्या तावदानावरून अेका मोठ्या छायेच्या झट्दिशीं दोन छाया झाल्याचे तिच्या दृष्टीस पडले व पावलाचा पटपट आवाज तिला अैकूं आला.



## प्रकरण नववें

# गोड शेवट

डॉक्टर रामरावाच्या औषधाने जो गुण अद्याप आला नाही तोच कमलला स्वतःच्याच औषधाने आला ! तिचेच औषध तिला चांगले लागूं पडले ! अशी जालीम मात्रा मिळाली कीं ज्याचे नाव तें !

शाता खोलीत आल्यानंतर कमल प्रत्यक्ष तिला काहीच बोलली नाहीं; कातालाही तिने कसलीच ओळख दिली नाही. ती शब्दाने बोलली नाहीं तरी तिने कृती मात्र बदलली. त्याच दिवशी नाही पण सकाळपासूनच, रोज आठ वाजल्यानंतर अुठणारी व शातेकडून सगळे अुपचार करून घेणारी कमल आज सकाळी सगळ्याच्या आधी अुठून, हेलकावे जात होते तरी स्वयपाकघरात गेली व स्टोव्ह पेटवून सर्वाच्या चहाच्या तयारीस लागली. रात्रीतून तिच्या आगात अितके बळ कोठून आले कुणास ठाअूक ! खिडकीतल्या साऱ्या औषधाच्या बाटच्या ओतून बाहेर फेकून दिल्या, साचलेल्या पुड्या आणून चुलीत टाकल्या व यापुढे कोणचेंही औषध घ्यावयाचे नाही असा तिने निश्चय केला. अितके रामबाण औषध स्वतःचे स्वतःला मिळाल्यावर दुसऱ्या औषधाची जरुरी काय ?

शाता व कात अुठण्याच्या अगोदरच त्याच्या अुशाशी पाण्याचे भांडे आणि चहाचे कप कमलने नेअून ठेअून त्याना जागे केले !

वाऱ्यानें हलणारी कमल, चहा स्वतः तयार करून हाक मारावयाला व अुठवावयाला आलेली पाहून दोघेही स्तिमितच झाली. ' हे काय, कमल ! अशानं तुझं दुखणं–' असे काहीं तरी विचारणार तोच कमलनें

शातपणाने अगोदरच खुलासा केला कीं ' अेका जागीं पडण्याचा व दुसऱ्याच्या हाताने करून घेण्याचा कंटाळा येअून आजपासून जेवढे काम हातून होअील तेवढे माझे मीच करण्याचे ठरविले आहे. अशानेच मला बरें वाटूं लागेल. ' त्यावर कात किंवा शाता काय बोलणार ! दोघानाही चोरट्यासारखे झाले ! कमलला अुठूं नको म्हणणे कठीण, अुठून काम करूं देणेही पण तितकेच कठीण ! जी कमल शातेला अुठल्यासुटल्या, हें कर, ते आण, अमके नको, चहा हवा, नीट निजीव, अुशी दे, गरम नको, आगाखाली दे अशाखाली अेकसारखे राबवीत असे, तिनेच आजपासून ते सर्व अेकदम बद केले. आपले कोणतेही काम कोणासही न सागता स्वतः तीच अेकेक करू लागली. अष्टौप्रहर न बोलता काताला नजरेसमोर ठेअून शातेला सतत बरोबर वागवू लागली. तिच्या बोलण्यातला पाहिला प्रेमळपणा जाअून त्यात कठोरपणा, तुसडेपणा व रूक्षपणा आला.

शाता स्वतःच्या वागणुकीने सुधाकराला मुकली होती. मुग्ध राहून त्याच्या अेकाही पत्राला अुत्तर न देता तिने सुधाकराला वाटाण्याच्या अक्षता लावल्या होत्या. पण आता कमल बरी होअूं लागल्यामुळे कातही हातचा निसटण्याची स्पष्ट चिन्हे दिसू लागून तिची अतिशय केविलवाणी स्थिती झाली होती. शातेला जातें म्हणता येअीना–जाण्यास तोंड नव्हते पण राहताही येअीना–राहणेच अशक्य होते. कमल तिला रोज काहीं ना काहीं कारणावरून अेकसारखी घालून पाडून बोलूं लागली होती. बायकाना तसे बोलणे कोणी शिकवावे लागत नाही; अुपजतच तें शहाणपण त्याना असतें ! स्पष्ट न बोलता कमल तिला अेकसारखे चिमटे घेत होती. आपण न बोलताच तिने आपसुखे निघून जावे याकरता कमल धडपडत होती. तोच प्रकार काताशीं वागताना ! त्याला तर तिनें धारेवरच धरला होता. अेक शब्दही बोलण्याची त्याला सोय नव्हती.

## गोड शेवट

कमलची प्रकृति झपाट्याने सुधारूं लागली होती. तर तीही झपाट्यानें काताला व शातेला घालूनपाडून बोलूं लागली. शातेला तर तोंड दाबून बुक्क्याचा मार होऊं लागला. कमलची पहिली मैत्रिणीची दृष्टि जाऊन सवतीची दृष्टि तिच्याकडे वळली होती. मग कमल बोलती का राहील ? विश्वासाने तळे राखावयाला लावले तर राखणारानेच अगोदर त्यातले पाणी चाखण्यास आरंभ केला तर ते कोणाला बरे वाटेल ? कात तर आताशा शक्य तितका बाहेरच वेळ काढूं लागला. 'कमल आता कितीही चागली झाली तरी पहिल्यासारखी ती दिसणार नाही आणि शातेसारखी तर नाहीच नाही ! पण तिला तर आता बरे वाटूं लागले आहे ! आता आपल्याला शातेचा वियोग होणार का ? प्रेमाची ताटातूट होणार का ? पण —पण त्याशिवाय काय गत्यंतर आहे ? आपण कमलचे अपराधी आहो-तच, आता शातेचेही अपराधी ठरणार ! या पेचातून आता सुटका कशी होणार' हेच विचार त्याला सारखे सतावूं लागले.

शाता कमलची अपराधी होती, सुधाकराची अपराधी होती, काताची अपराधी होती आणि स्वतःची तर अपराधी होतीच होती. या चौपदरीं पेंचातून सहिसलामत सुटावयाचे कसे हाच तिच्यापुढे प्रश्न होता. नाहीं सुधाकर, नाही कात ! आपल्या प्रेमसंसाराचा असाच खेळखंडोबा झाला तर जगण्यात तरी काय राम आहे असेसुद्धा तिच्या मनात विचार येऊं लागले होते. दररोजची कमलची कुचकीं बोलणी तिला असह्य होऊं लागली होती. कमल तिला जा म्हणत नव्हती. ठेऊन घेण्याची तिची अिच्छा नव्हती. मग तिने अशा स्थितीत काय करावयाचे ? अष्टौप्रहर कमलचा दोघावरही खडा पहारा राहूं लागल्यामुळे चोरून भेट घेणेही दोघांना मुष्कील झाले. भेटता येअीना, बोलता येअीना किंवा अशा स्थितींत पुढे कसें वागावयाचे, काय करावयाचे हेंही ठरवितां येअीना.

शाता–काताची घरातल्या घरात चागलीच कुचंबणा होअूं लागली. घरा-तला आनंद मावळला, हंसणे–खिदळणे सपले, सर्वत्र असंतोष–संताप–मत्सर–धूसपूस याचेच साम्राज्य पसरले ! प्रत्येकाला जीव नकोसा वाटे पण अुघड कोणालाही काहीच बोलता येअीना !

अशाच स्थितीत अेक दिवस कमल रोजच्यापेक्षा काम करून जास्त दमली म्हणून हुश्श करून खाली बसली.

“ अजून होत नाहीं तर अितकं काम केलंस का ! ” कात समोरच होता तो सहजगत्या म्हणाला.

“ मग काम केल म्हणून मी काही मरावयाची नाही. अगदी तुम्ही कुणीं विष घातलं तरीसुद्धा मरणार नाही मी ! ” कमल म्हणाली.

“ म्हणजे ! आम्हीं काय तुला वीष घालायला बसलो आहोत वाटतं !”

“ हो ! फटाकड्या नव्या बायका मिळाव्यात म्हणून पुरुष आपल्या बायकाना वीष सुद्धा घालायला कमी करायचे नाहीत !”

यावर कात काहीच बोलला नाही. काय बोलणार ! थोडा वेळ जाअूं देअून रहावेना म्हणून, प्रथम ज्या अर्थाने त्याने बोलण्यास सुरवात केली होती त्याच अर्थाने पुन्हा तो म्हणाला, “ पण मी म्हणतो, घरी शाता आहे तिला काम सागाव. सगळी कामे करू लागून दुखण पुन्हा अुलट-णार नाहीं का ! शाता घरात नसती तर अेक गोष्ट वेगळी !”

“ पण शाता आहे म्हणूनच तर मी दमल्याचे नजरेला येतंय ! अुद्यां तिला तिच्या घरी पाठवावी कशी !”

“ म्हणजे ! मी कसा तिला जा म्हणून सागूं ! तूं तिला बोलाविले आहेस, तूंच तिला जायला साग—”

“मी काय म्हणून जायला सागूं ! आमच्या घरीं खायला प्यायला कमी नाहीं. मला बरं वाटतं नव्हतं म्हणून मी तिला आणली. आता मला बरं

वाटूं लागलं आहे हे तिला दिसतच आहे. जायचं राह्यचं तिला कळतंय! मी तिला जा म्हणणार नाही, नी निघाली तर काहीं हाताला धरून ठेअून घेणार नाही, हे सागते. जात नसली तरीही काही तिला मी बाहेर घालविणार नाही!'' कांताचें तोंड बंदच झाले.

हे बोलणे माजघरात चालले होते. बाहेरच्या पडवीतच शांता होती. ती पतिपत्नींचे सर्व बोलणे निमूटपणे अैकत होती. त्यातलि प्रत्येक शब्द तिच्या हृदयाला घरे पाडीत होता. त्यातून ते अर्धवट वाचावयाचे राहिलेले पत्र तिने नुकतेच पोलक्याच्या खिशातून काढून वाचले होते. 'या पत्राचे अुत्तर दोन दिवसात आले नाही तर तूं मला नाकारले आहेस, तुझा दुसराच कोणी जिवलग आहे असे समजून मी तुझा नाद सोडून देअीन आणि आज कित्येक दिवस अेका गरीब मुलीचा बाप माझ्यामागें आपली मुलगी करून घ्या म्हणून लागला आहे त्याला रुकार देअीन. ती मुलगी जास्त शिकलेली व देखणी असून अेका गरीबीशिवाय तुझ्यापेक्षा सर्वच बाजूंनी श्रेष्ठ आहे तेव्हा तिला पत्करल्याने माझे तादृश्य काहीच नुकसान होणार नाहीं. तुझा शब्द माझ्यावर येअू नये म्हणून हे लिहिले आहे. तुझा विचार तूंच कर आणि काय ते कळीव' या अर्थाचे ते पत्र होते. त्या पत्रातील मुदत केव्हाच निघून गेली होती व तिकडून तिची कायमची निराशा झाली होती. त्यामुळे ती हजारदा मनात म्हणे कीं, आता कमलला सारे सारे सुधाकराविषयींचे गुपित सागावे. तुझ्याच बोलण्यानें मी कशी वागले, सुधाकराला कसे निराश केलें आणि आता अुभ्या आभाळाखाली तुझी सवत होअून राहण्याशिवाय आपल्याला कसे गत्यंतर नाहीं. आता तूंच तार किंवा मार, तुझाच अेक मला आधार! असें सांगून मोकळे व्हावे. चूक आपली असली तरी तिचीही थोडीशी आहे. सर्वांच्या चुका सर्वजण वाटून घेअूं या असे तिला पटवून सागावे.

पण सागावयाचें कसे ! आणि अैकणार कोण ! दरघडी धरणीमाता दुभंग होअून आपल्याला पोटात घेअील तर बरें असे शातेला वाटत होतें. पश्चातापाचे चटके काळजाला बसत होते, दुःखाचे कढ अेकसारखे येत होते व चोहींकडे निराशा, अंधार व अगतिकपणाच तिला दिसत होता.

अजूनही आतून पतिपत्नींचे शब्द कानीं पडत होते. तिचा अूर भरून येत होता, डोळ्यात पाणी डबडबले होते व हुंदका दाटला होता. ‘ काही करा पण शाता आजच्या आज या घरातून गेली पाहिजे तरच मीं अन्नग्रहण करीन’ असे कमलचे दुष्ट शब्द तिच्या कानी पडले. शाता तर बधीरच झाली; तिला हुंदका आवरेना.

नंतर आत स्तब्धता पसरली.

शातेची नजर समोर आगणात गेली. दारापुढे टागा अुभा राहिलेला तिने पाहिला. टाग्यातून झकपक पोशाख केलेले दोन तरुण अुतरून आगणात आलेले तिला दिसले. अेक सुधाकर व दुसरा मधुकर होता.

दोघानीही शातेला पाहिले. शातेचे दुःखाश्रु त्याच क्षणी आनंदाश्रु झाले. “ अग बाअी, मधुदादा नी—” असे म्हणत ती धावतच बाहेर आगणात आली. तिचा शब्द अैकून कातही बाहेर आला. त्याने पाहुण्याना पाहिले व मधुकराला ओळखले. सर्वांचे नमस्कार चमत्कार झाले !

सुधाकर हंसला. मधुकर हंसला.

शाता रडत होती—–हंसतही होती. तिने डोळेसुद्धा पुसले नाहींत.

कातालाही आनंद झाला ! सुटलों अेकदाचा अशा थाटाने त्यानें अेक दीर्घ निश्वास सोडला. कमलही ती गडबड अैकून बाहेर आली.

“ ही तुझी शांताताअी, पहा—” सुधाकर मधुला म्हणाला.

“ तूंच पहा. तुझ्या मनाला अशात करणारी तुझी लाडकी शांता ! पडला आतां जीव खालीं !” आंगणांतून घरात येत येतच मधुकर म्हणाला.

घरात सर्वत्र आनंदी आनंद होऊन हंसतखेळत बोलणी सुरू झाली.

ø ø ø ø

दोघेही शातेला नेण्यासाठीच आले होते. सुधाकराचे भावी नातें मधुकराकडून कळल्यावर कमलची व कांताची काय विलक्षण स्थिति झाली! कमलला फारच पश्चात्ताप झाला; तिने नाना प्रकाराने आणि नाना तऱ्हेने लक्ष वेळा शातेची क्षमा मागितली व तिचे पाय धरले.

शातेने मधुकराला व सुधाकराला अिकडची साद्यंत हकीकत सांगितली.

कांताने शातेची, सुधाकराची व कमलचीही क्षमा मागितली.

अुलट शातेनेही कमलची, कांताची व सुधाकराची क्षमा मागितली.

कमलने कांताला व कांतानें कमलला क्षमा केली.

पत्राची अुत्तरे न पाठविण्याचे व तदंतर्गत हजारो अक्षम्य असे शातासरितेचे अपराध सुधाकराने मोठ्या अंतःकरणाने पोटात घातले. स्वतःचे आवडते माणूस मिळाल्यावर अपराध शिल्लक अुरणार कसे!

ø ø ø ø

थोड्याच दिवसानीं घडून आलेल्या शाता–सुधाकराच्या लग्न समारंभास कमल–कान्त मुद्दाम गेले होते.

ø ø ø ø

आजही कमला–कान्त खरोखरच सुखात नादत आहेत.



**यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम्।**
**त्वया कृतं तु फलभुक् त्वमेव मधुसूदन॥**

# भावंडांच्या भेटी.

( १ सुकलेले फूल, २ अटकेपार, ३ फोल आशा, ४ संसारशकट.)

१ " **सुकलेलें फूल** " ( लेखकः—श्री. पी. वाय्. देशपाडे, प्रकाशक गणेश महादेव आणि मंडळी, पुणे २ ) या छोटेखानी कादंबरीवजा गोष्टीचे नाव जरी सुकलेले फूल असे असले, तरी खरोखरीच ते ताजें टवटवीत आहे. विचारानी ताजे आहे, आकाराने आटपशीर आहे, कल्पनेने मधुर आहे, भावनेने सुगंधित आहे. थोडक्यात सागावयाचे झाले, तर ते एक सुन्दर गद्यकाव्य आहे !

२ " **अटकेपार** " ( लेखकः—श्री. ना. सि. फडके, एम्. ए. प्रकाशक, गणेश महादेव मंडळी, पुणे. ) प्रो. फडके याच्या पूर्व लौकिकाला साजेशीच ही कादंबरी रमणीय आहे. कै. राम गणेश गडकरी याचे वाङ्मय एक प्रकारे कल्पनाच्या खेळानी आणि भाषेच्या सौंदर्यानी रसिक हृदयाला वेड लावण्यात अग्रगण्य ठरले; तोच प्रकार प्रो. फडके याच्या वाङ्मयासंबंधात आहे, असे बिनदिक्कत म्हणता येते ! सदा दुःखीकष्टी जीवाना उच्च प्रकारचीं सुखस्वप्नेसुद्धा सुखी करीत असतात; त्याचप्रमाणे आशावादी गरीब जीवाना प्रो. फडके याच्या वाङ्मयविलासात त्यावेळेपुरते स्वर्गीय सौख्य मिळाल्याशिवाय राहात नाही. प्रो. फडके यानी " अटकेपार " नावाने प्रतिपादित विषयाचा जो ध्वनि निनादित केला आहे, आणि कादंबरीची अखेर अटकेच्याच नव्हे तर जगाच्याही पार करण्यात केली आहे, याबद्दल कितीकाना कै. गडकरी याच्या " प्रेमसंन्यास " नाटकाच्या अखेरीची आठवण होईल. पण असे विषय असेंच सोडविणे बरे. संकेतहेतु पुढें अवघ्या अंगानी माडल्यावर प्रत्यक्ष शेवट कसाही दाखविला तरी विचारवंत त्यातून काय ग्राह्यांश घ्यायचा तो घेणारच !

३ “ **फोल आशा** ” ( लेखक—श्री. वि. वि. बोकिल, बी. ए. प्रकाशक, गणेश महादेव आणि मंडळी, पुणे २ )

‘ बेबी’ आदि करून आरंभीच्या काहीं सुन्दर लघुकथानीं स्वाभावीकच हौशी व तरुण वाचकाचें लक्ष एकदम आपल्याकडे वेधून घेणाऱ्या श्री. वि. वि. बोकील यानीं “ **फोल–आशा**” लिहिली आहे. ही “फोल आशा ” वाचताना व वाचून झाल्यावरही पुष्कळाची श्री. बोकिल याच्या लेखनाविषयीची आशा फोल झाल्याचें ऐकिवात होते व वाचून झाल्यावरही तोच अनुभव प्रस्तुत वाचकाला आला. प्रस्ताविकदाखल लिहिलेल्या पानात श्री. बोकील यानीं, टीकाकाराना निधड्या छातीने अगाऊच आडवे–उभे–असे शब्दाच्या फटकाऱ्यानी लवे करून,टीकाकारानाच दहशत बसविण्याचा आव कितीही आणला असला तरी पुस्तकाला “फोल आशा” नाव ठेवण्यात,त्यानाही आपल्या लेखनाबद्दल फोल आशाच वाटत असावी, असे अनुमान करणें खास धाडसाचे होणार नाही. मते विचित्र, विक्षिप्त, सामान्य वाचकाना बरी न वाटणारी विधाने कितीही लेखकाची असली तरी चालतात. पण लेखनात एक प्रकारचे तेज, ओज, ओघ, आणि वाचकाच्या मताची पकड धरण्याची खुबी लेखनात साधावी लागते असे असलें म्हणजे वाचकाला आशा फोल झाल्या असे वाटत नाही. पण ती पकड श्री. बोकिल याना आपल्या लेखनात साधली नाही इतके प्राजलपणें कबूल करावे लागते. त्याच्यातील ती उणीव प्रकाशकानीं मुखपृष्ठावर सुन्दर रंगीत चित्र घालून अंशतः भरून काढली आहे.

४ “ **संसारशकट** ”–( लेखक व प्रकाशक श्री. **यशवंत कृष्ण** संपादक–नवाकाळ, मुबई. आवृत्ति १ ली. किं. १॥ रुपाया. )

अंगात तितकीच धमक असल्याशिवाय लेखनसंसाराच्या आरंभींच कोणताही नवखा लेखक ध्येयाविशिष्टलेखन हातीं धरण्याच्या भानगडींत पडणार नाहीं. आणि क्वचित् पडलाच तर त्यात त्या लेखकाला सप्रमाण,

सखोल आणि विस्तृतपणात ध्येयाचा राम दाखविता येणे कठीण आहे. परंतु " संसारशकट " लिहिणारे श्री. यशवंतराव खाडीलकर यानीं आरंभींच " पतीपत्नीचा " संसारातील समान दर्जा, बरोबरीचा हक्क, असला ध्येयप्रधान विषय निवडून त्यावर आपल्या सुन्दर कादंबरीमंदिराची भव्य इमारत रचिली हें त्यास भूषणावहच आहे. " पतिपत्नी " च्या, " तरुण-तरुणी " च्या, प्रणयीप्रणयिनीच्या वायफट प्रेमजालात न गुरफटता नीलकंठ–सरल, वासुदेव–विमल हीं जोडपीं घेऊन त्याना वरच्या वातावरणात जबाबदारीने विहरावयाला लेखकाने लावलें आहे. अल्पवयात, 'नवाकाळ'सारख्या दैनिकात जबाबदारीने काम करून त्यातूनही वेळ काढून " संसारशकटा " सारखे जुन्यानव्याना पटणारे, पचणारे, रुचणारे, उत्तेजक शब्दचित्र वाचकाच्या हातीं त्यानीं दिले, याबद्दल कोणीही सहृदय रसिक लेखकाचे सकौतुक अभिनंदनच करील. ग्रंथकारास आवश्यक लागणारे गुण श्री. यशवंतरावात उपजत आहेत हे तर त्याच्या संसारशकटांत दिसतेच. पण त्यानीं आपल्या उपजत गुणात अभ्यासाची भर घातली आहे हेही आढळून येते. त्याची जबर ध्येयनिष्ठा पानापानावर आढळते. संसारातील साधेसुधे, खरेखुरे प्रसंग लेखनात जिवंत वठविण्याचे सामर्थ्यही त्याच्याजवळ दिसते. विषयाची चर्चा करण्याची हौस, पक्षप्रतिपक्ष आपणच निर्माण करून त्यात रंगण्याची तयारी गंभीर वेळीं गंभीर, गंमतीच्या वेळी गंमत, हेही त्याना साधतां येते हे संसारशकट सागूं शकेल. सूक्ष्म निरीक्षण, साधक बाधक विचाराची प्रणालिका, आणि ग्रंथाची प्रमाणबद्ध घटना करण्याचे कौशल्य लेखकात वास करीत असून त्याबरोबर अचल अखेर मनाचा धिम्मेपणा लेखकाला अत्यावश्यक असावा लागतो तोही श्री. यशवंतरावात भरपूर आहे यांत शंकाच नाहीं. आरंभींच्याच कादंबरीनें यशवंतरावांना इतकें यशवंत केलें आहे कीं, यानंतरच्या त्याच्या लेखणींतून उतरणाऱ्या प्रत्येक कृतीकडे मराठीवाचकवर्ग आतुरतेनें लक्ष लावून बसेल असें खास वाटतें.